भाग २

## बालभारती

# उत्तम संस्कार कथा

इयत्ता पाचवी व सहावी



# बालभारती

# उत्तम संस्कार कथा - भाग २

## (इयत्ता पाचवी व सहावी)

संपादन

**माधव राजगुरू**

विशेषाधिकारी - मराठी विभाग

पाठ्यपुस्तक मंडळ, पुणे ४.



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

## विशेष आवृत्तीची प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, 'बालभारती', पुणे या संस्थेने २००२ साली उत्तम संस्कार कथा तीन भागांत प्रकाशित केल्या आहेत.

प्राचीन काळात घरातल्या घरात दिल्या जाणाऱ्या नीतिशिक्षणाप्रमाणेच आजच्या काळात सार्वत्रिक शिक्षणात नीतिशिक्षणाचा किंवा दुसऱ्या शब्दात मूल्यशिक्षणाचा अंतर्भाव करण्याची गरज निर्माण झाली आहे. मुलांना उत्तम नागरिक बनण्यास सक्षम होण्यासाठी असे संस्कार साह्यभूत ठरु शकतील. याचा विचार करुन विद्यार्थ्यांना वाचनाची प्रेरणा मिळावी, वाचनातून त्यांची अभिरुची समृद्ध व्हावी आणि त्यांच्यावर सहजपणे उत्तम संस्कार व्हावेत, या भूमिकेतून उत्तम कथांची ही माला मुलांच्या अवांतर वाचनासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

या पुस्तकांना विद्यार्थी, शिक्षक व पालक यांचा उत्तम प्रतिसाद मिळत आहे. वाचकांचा हा प्रतिसाद लक्षात घेऊन 'बालभारती' संस्कार कथामालेची अधिक टिकाऊ स्वरुपातील विशेष आवृत्ती प्रकाशित करत आहे. त्यापैकी उत्तम संस्कार कथा भाग-२ हे पुस्तक आपल्या हाती देताना विशेष आनंद होत आहे. यातील संस्कार कथांच्या वाचनाचा लाभ जास्तीत जास्त विद्यार्थी, शिक्षक व पालक घेतील, अशी अपेक्षा आहे.

(एम.आर.कदम)
**संचालक**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे-४.

पुणे
दि.१ जानेवारी २०१०

## प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळनिर्मित उत्तम संस्कार कथेचा दुसरा भाग आपल्या हाती देताना, आम्हांस अत्यंत आनंद होत आहे.

शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित प्राथमिक स्तरांमधील इयत्ता पहिली ते आठवीपर्यंतच्या विद्यार्थ्यांसाठी सर्व विषयांच्या पाठ्यपुस्तकांची निर्मिती महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ करत असते. १९६७ पासून वेळोवेळी बदललेल्या अभ्यासक्रमानुसार मंडळाने आतापर्यंत बालभारतीच्या चार माला प्रकाशित केल्या आहेत. मंडळात मराठीबरोबरच हिंदी, इंग्रजी, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलुगु, गुजराती अशा आठ भाषांमध्ये पाठ्यपुस्तकांची निर्मिती केली जाते. या आठही भाषांमधील बालभारतीच्या पाठ्यपुस्तकांत आतापर्यंत अनेक उत्तमोत्तम कथा प्रकाशित झाल्या आहेत. बाहेर कुठेही उपलब्ध होऊ न शकणाऱ्या बालभारतीतल्या अनेक उत्तमोत्तम निवडक संस्कार कथांचे पुस्तक मुलांच्या अवांतर वाचनासाठी प्रसिद्ध करण्याची कल्पना मंडळाच्या मराठी विभागाने मांडली, त्यानुसार मंडळ या कथा 'उत्तम संस्कार कथा' या नावाने तीन भागांत प्रसिद्ध करत आहे. विद्यार्थ्यांमध्ये चांगल्या वाचनाची आवड निर्माण व्हावी, त्यांच्या ज्ञानात भर पडावी, नकळत त्यांच्यावर चांगले संस्कार व्हावेत हा या पाठीमागचा हेतू आहे.

मराठीव्यतिरिक्त हिंदी, इंग्रजी, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलुगु, गुजराती या भाषांच्या पाठ्यपुस्तकांतील कथांची निवड संबंधित भाषाधिकाऱ्यांनी केली आहे. अनुवादकांनी त्या त्या भाषेतील कथा मराठीत अनुवादित करून मोलाचे सहकार्य केले आहे, त्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

सदर पुस्तके मुलांच्या पुरवणी वाचनासाठी प्राथमिक स्तरावरील शाळांनी वापरायची आहेत. मुलांना यातील कथा आवडतील अशी आशा आहे.

(एन. के. राठोड)
**संचालक**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे ४.

# प्रास्ताविक

गोष्टी ऐकणे आणि ऐकवणे ही आपली नैसर्गिक आवड आहे. प्राचीन काळी वेदवाङ्मयात काही कथा आढळतात. रामायण, महाभारत अशा पौराणिक वाङ्मयामध्ये अनेक कथा आणि उपकथानकांची जोड देऊन त्यांची गुंफण केलेली आढळते. अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात काश्मिरी पंडित सोमदेव याने 'कथा सरित्सागर' हा ग्रंथ रचला. तेराव्या शतकात महानुभाव पंथीय ग्रंथांमधील लीळांच्या रूपात सांगितलेले 'दृष्टांत' छोट्या स्वरूपातील कथाच आहेत. तात्पर्य कथा हा अत्यंत प्राचीन आणि समृद्ध वाङ्मयप्रकार आहे. कहाण्या, परिकथा, बोधकथा, मिथ्यकथा, रूपककथा, लघुकथा ही कथेचीच विविध रूपे आहेत. यात आधुनिक काळात नवनव्या कथाप्रकारांची भर पडलेली आहे.

प्राचीन काळातील कहाण्याचे स्वरूप धार्मिक होते. या कहाण्या वडीलधाऱ्या स्त्रियांनी लेकी-सुनांना चांगले वळण लागावे म्हणून सांगितलेल्या असत. कहाणी ऐकणे ही मुलांची नैसर्गिक आवड असल्यामुळे पूर्वीच्या काळी एकच कुटुंबपद्धतीमध्ये आजी आपल्या नातवंडांना गोष्टी सांगत.

यातून आजीचा वेळ तर चांगला जात असेच, शिवाय मुलांची करमणूक आणि त्यांच्यावर चांगले संस्कार असे तीन हेतू साध्य होत. याला आपण घरातल्या घरात दिलेले नीतीपाठ किंवा नीतीशिक्षण असेही म्हणू शकतो.

प्राचीनकाळी घरातल्या घरात दिल्या जाणाऱ्या नीतिशिक्षणाप्रमाणेच आजच्या काळात सार्वत्रिक शिक्षणात नीतिशिक्षणाचा किंवा दुसऱ्या शब्दांत मूल्यशिक्षणाचा अंतर्भाव करण्याची गरज निर्माण झाली आहे. समाजातील काही घटकांत पोसलेला चंगळवाद, सर्व क्षेत्रे व्यापून राहिलेला भ्रष्टाचार, वाढता हिंसाचार यामुळे समाजाची अपरिमित हानी झाली आहे. समाजाच्या या अध:पतनाचे प्रमुख कारण म्हणजे समाजाची नीतिमूल्यांशी झालेली फारकत हेच होय; म्हणून समाजाची पायाभरणी करणाऱ्या शिक्षणक्रमात प्राथमिक स्तरावरील मुलांना नीतिमूल्यांच्या संस्काराचे धडे देण्याची सोय केल्यास भावी समाजाचे चित्र आशादायी असेल.

आजचा काळ नभोवाणी, दूरचित्रवाणी, चित्रपट, संगणक यांच्या प्रभावांचा काळ आहे. माणसाने माणसांसाठी निर्माण केलेल्या या सोई आहेत. या अत्याधुनिक सुखसोयींमुळे माणसाचे वाचन कमी होत चालले आहे. अशा परिस्थितीमध्ये मुले शाळेमध्ये जेवढा काळ शिक्षण घेत असतात, त्या काळात तरी त्यांना चांगले साहित्य वाचण्यासाठी उपलब्ध करून दिले पाहिजे; जेणेकरून मुलांच्या मनावर चांगले संस्कार बिंबून ते उत्तम नागरिक बनण्यास सक्षम होतील.

मुलांवर चांगले संस्कार केवळ कथेतूनच होतात असे नाही. वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये यशाची उत्तुंग शिखरे गाठलेल्या थोर व्यक्तींच्या जीवनचरित्रातूनही मुलांना उत्तम शिकवण मिळत असते. प्रतिकूल परिस्थितीतही कर्तृत्वाचे डोंगर उभे करणाऱ्या या व्यक्ती सदैव मार्गदर्शन करणाऱ्या दीपस्तंभाप्रमाणे असतात; म्हणून या संस्कार कथासंग्रहांमध्ये जगदीशचंद्र बोस (तेलुगु), विक्रम साराभाई (गुजराती), सुभाषचंद्र बोस (हिंदी), आर्यभट्ट (सिंधी), भगवान गौतम बुद्ध (मराठी) अशा थोर व्यक्तींच्या जीवनचरित्राचा समावेश केला आहे.

मुलांची संवेदनशीलता आणि त्यांचे भावविश्व जपणाऱ्या आणि समृद्ध करणाऱ्या अनेक कथा या संग्रहात आलेल्या आहेत. पप्पू आणि चिमणीचं घरटं (गुजराती), मनोज (इंग्रजी), मैत्री (उर्दू), पाच रुपयाचा शिक्का (उर्दू), ठोकळ्याचे चित्र (मराठी) यांसारख्या कथा मुलांची मनं जाणून घ्यायला मोठ्यांनाही मदत करणाऱ्या आहेत.

मुलांच्या भावविश्वाची दखल घेणाऱ्या या कथा मुलांवर उत्तम संस्कार करतील आणि त्यांना वाचनाची प्रेरणा मिळून त्यांची अभिरूची समृद्ध होण्यास साह्यभूत ठरतील अशी आशा वाटते.

# अनुक्रमणिका



# १. मी श्रीमंत आहे !

कोर्टातील काम संपवून मी बाहेर पडलो आणि लगेच टांगेवाले माझ्याभोवती गोळा झाले. प्रत्येक जण म्हणायला लागला, ''चला साहेब, आपला टांगा आहे.'' त्यातच एक नव्याने आला व जणू काय मी त्याचे रोजचेच गिऱ्हाईक अशा थाटात बोलू लागला, ''आपला टांगा आहे साहेब, चला.'' घोड्यासमोरचे गवत उचलून टांग्यात टाकत आणखी एक जण म्हणाला, ''टांगा तयार आहे साहेब.''

सगळ्यांची गंमत मी बघत होतो. टांग्यातून जायचं नाही, असा आधीच मनाशी मी विचार केला होता. त्यामुळे टांगेवाले भरमसाट पैसे मागतील आणि नाइलाजाने ते आपल्याला द्यावे लागतील अशी भीती नव्हती. टांगेवाले अनेक आणि गिऱ्हाईक मी एकटाच. मी एकाला सहज विचारले, ''काय घेशील रे धंतोलीचं?''

''सव्वा रुपया द्या साहेब.''

''जाऊ द्या. आपल्याला टांगाच नको.'' असे म्हणून काही न बोलता मी तसाच पुढे चालू लागलो.

पण दोन पावले टाकतो न टाकतो तोच एक टांगा माझ्या उजव्या बाजूला येऊन उभा राहिला. त्याच वेळी टांगेवाल्याचे शब्द कानी पडले, ''बसा साहेब.''

''काय घेशील?''

''आपण जे द्याल ते घेईन.''

''नाही, नाही, तू काय घेशील ते आधी सांग.''

''आपण द्याल ते घेईन साहेब.''

''मला झगडा, तंटा नाही आवडत. घरासमोर हुज्जत नको. चाळीस पैसे देईन मी. पटेल तर चल, नाही तर नको.''

''आपण द्याल ते खुशीनं घेईन साहेब. बसा.''

मी टांग्यात बसलो. टांगा चालू झाला.

मला नवल वाटले. एका टांगेवाल्याने मला सव्वा रुपया मागितला. गिऱ्हाइकाला अडवूनच धरायचे धोरण ठेवले, तर सव्वा रुपया मिळतोही त्यांना. जरी सव्वा रुपया न मिळाला, तरी निदान सत्तर-ऐंशी पैशांना तरी कुठे मरण नसते. मग हा टांगेवाला इतक्या थोड्याशा पैशावर यायला कसा तयार झाला ? मला याचे आश्चर्य वाटले. मी त्याला सरळच विचारले, "एवढ्या थोड्या पैशात तू माझ्यासारखं गिऱ्हाईक कसं पत्करलंस ? साठ-सत्तर पैसे गमावून बसलास तू."

"गोष्ट अशी आहे साहेब, आपण विचारलं म्हणून सांगतो. ह्या महागाईनं भाव तर खूप वाढले. आम्ही वीस-पंचवीस पैशांत जिथं जात होतो, तिथं आज रुपयाच्या खाली हटणार नाही. बड्या लोकांना अडवलं तर पैसा देतील साहेब, पण राजीखुशीनं नाही. तुम्हांला दिल आहे साहेब, पण तुमची मिळकत बेताचीच असणार. मी हे म्हणतो म्हणून राग मानू नका. जिथं पैसे मिळवायचे तिथं खूप मिळवून घेतो, पण प्रत्येक वेळेला माणसाला अडवावंसं नाही वाटत. आता त्या वकीलसाहेबांकडं पाहा." असे म्हणून त्याने अंगुलिनिर्देश केला. "कोसावर घर आहे. मनात टांगेवाल्यांना शिव्या देत चालले असतील. पैसा चांगला मिळतो त्यांना; पण देण्याची नियत नाही. आपल्याला इच्छा असून देणं जमत नाही, म्हणून मी आलो."

मी त्याचे उत्तर ऐकले ; जरा गंमत वाटली. पहिल्यांदा तर रागही आला. म्हातारा उदारपणा दाखवतो आहे. आपल्या मोठेपणाने मला भारण्याचा प्रयत्न करतो आहे. जास्त पैसे माझ्या हातून सुटावे, हाही उद्देश असेल अशा रीतीनं बोलण्यात, असे मला वाटले; पण असेही वाटले, कुणाच्या भलेपणाचा का संशय घ्यावा ? खरोखर त्याचे हे विचार नसतील कशावरून ?

टांगेवाल्याने मला विचारले, "किती दिवस झाले आपल्या वकिलीला वकीलसाहेब ?"



"झाली दोन-तीन वर्षं."

"ठीक चालली आहे ना वकिली ?"

"ठीक कशाची ? मिळतं पोटापुरतं."

"आपलं लग्न झालंच असेल ?"

"छे ! छे ! अजून लग्न झालं नाही माझं."

"नाही ?" केवढ्या विस्मयाने तो म्हणाला ! आणि पुढे बोलला, "माझ्या मुलाचं लग्न होऊन तर चार वर्षं झाली."

"काय करतो आपला मुलगा ?"

"वकील झाला आहे तो, पण फॅक्टरीमध्ये काम करतो."

"अस्सं ! पगार चांगला मिळत असेल ?"

" जी हाँ, पण त्यानं तसलं काम करावं हे मला बरं वाटत नाही."

"मग ?"

"तो साहेब झाला की बस."

"मग यात कठीण काय आहे ? सहज होता येईल त्याला."

"एखाद्या बड्या माणसानं हाताशी धरलं तर ठीक; गरिबाला कोण विचारतो ? या जगात फक्त दोन प्रकारचे लोक आहेत साहेब. अमीर आणि गरीब. माझ्या घराजवळ एक गरीब हिंदू पोरगा होता. मॅट्रिक पास झाला फर्स्ट क्लासात; पण त्याला कोणी मदत केली नाही. त्याचा बापही वारला. पोरगा माझ्या कुशीत पडून हमसाहमशी रडला. माझ्याच मुलाबरोबर शिकला आहे तो. आता तो मलाच बाबा मानतो. फॅक्टरीतच काम करतो तोही. या दुनियेत गरिबांशी कोणी संबंध ठेवत नाही. मग तो हिंदू असो की मुसलमान असो. माझा मुलगा चिंतामणला आपला भाऊच मानतो. माझा पोरगाही भला आहे. शिकला आहे, पैसाही कमावतो. तो कधीकधी मला म्हणतो, 'अब्बाजान, आता सोडा हे काम. सुट्टी द्या टांग्याला. आता विश्रांती घ्या. तुमचा पोरगा आता कमवायला लागला आहे.' पण मी ऐकत नाही त्याचं बोलणं. पोरगा आपल्यापरी ठीकच सांगतो, पण टांगा सोडून देऊन मी काय

करू ? म्हाताऱ्या जनावराप्रमाणं घरात पडून राहणं तर बरं वाटत नाही. कधी हां म्हणतो, कधी ना करतो, पण तोही समजून घेतो.''

''बुढेमिया, आपण तर आपल्या पोराला खूप चाहता. पोरगा शिकला आहे, वकील झाला आहे. आज पगारही चांगला मिळवतो. असे कित्येक बाप आहेत की जे आपल्या पोरांना वाढवतात, मोठं करतात, त्यांच्यावर पैसा खर्च करतात आणि अशा रीतीने वाढवलेल्या पोरांना पैसा मिळू लागला, की त्यांना धुंदी चढते. आपला पोरगा मानतो आपल्याला – की टांगेवाला म्हणून ... ?''

''जी नहीं, देवाची दया आहे, अल्लाचा आशीर्वाद आहे. बडा नेक आहे माझा पोरगा. रस्त्याने टांगा हाकत असताना एखाद्या वेळी तो मला भेटतो. वाटेतच माझी चौकशी करतो. बरोबर दोस्तही असतात. एखादा दोस्त मधूनच विचारतो, 'काय रे, तुझा या टांगेवाल्याशी काय संबंध ?' तर माझा पोरगा सांगतो, 'माझे वडील आहेत ते.' माझा मुलगा मला मानतो ही केवढी आनंदाची गोष्ट ! मी एक मामुली टांगेवाला ; पण श्रीमंताहून श्रीमंत आहे !'' हे शब्द बोलत असताना बुढेमियांच्या शब्दाशब्दांमधून अभिमान उचंबळत होता.

घर आले म्हणून मी टांगा थांबवायला सांगितले. खिशातून रुपयाची नोट काढली व मियाजींच्या हातावर ठेवली. साठ पैसे त्यांनी मला परत केले आणि टांगा जागचा हालला. तो दिसेनासा होईपर्यंत मी पाहतच राहिलो.

लेखक - गो. रा. दोडके

•••

मराठी
बालभारती : इ. ५ वी
पहिली माला : १९७०



# २. भेट

आज कित्येक वर्षांनी दिल्लीत स्थायिक होण्याचा पुन्हा मला योग आला होता. फिरून एकदा कितीतरी वर्षांनी मी जुन्या दिल्लीत निघालो होतो. चांदणी चौक या नावाने जो भाग ओळखला जातो त्या भागातल्या बऱ्याच गोष्टी माझ्या परिचयाच्या होत्या. तिथले देऊळ, तिथली रहदारी, तिथली दुकाने सारे-सारे मला आठवत होते.

मला थोडीबहुत खरेदी करायची होती; ती मी आधीच केली होती. माझी बेबी आता नुकतीच इंग्रजी शिकू लागली होती. तिच्यासाठी पहिले प्रायमर आणायचे मी कबूल केले होते. ते मी एका छोट्या पुस्तकाच्या दुकानात जाऊन खरेदी केले आणि घरी परत निघालो.

रस्त्याच्या दोन्ही बाजूंना फुटपाथवरून छोट्या-छोट्या लाकडी खोक्यांवर पुरी-भाजीची, चिक्कीची, खजूर-मिठाईची दुकाने निर्वासितांनी थाटली होती. जीवनातली त्यांची चाललेली ती धडपड पाहून माझे मन गुदमरून गेले. मी नजर वळवली. पंधरा पावले पुढे गेलो आणि फिरून एका दृश्यावर माझे लक्ष वेधून राहिले.

एक चार चाकांची, 'हरेक वस्तूंनी' भरलेली हातगाडी एका झाडाच्या आडोशाला उभी होती. त्या गाडीच्या खाली सावलीत एक दहा-बारा वर्षांचा तरतरीत मुलगा देवदारी खोक्यावर मान खाली घालून बसला होता. मधूनमधून मांडीवर उघडून ठेवलेल्या पुस्तकात पाहून तो पाटीवर लिही. तो अभ्यासात अगदी मग्न झालेला होता.

खरेतर हसायचे, खेळाबागडायचे वय होते त्याचे ते, पण या वयात केवढी समज आली होती त्याला !

एवढ्या लहान वयात हातपाय हालवून स्वतःचे पोट भरायला तर तो शिकला होताच; शिवाय त्यातूनही वेळ काढून अक्षरओळख करून घ्यावी अशी त्याची धडपड चालली होती, त्याचे मला फार फार कौतुक वाटले.

त्याच्याशी चार शब्द बोलावेत अशी मला फार इच्छा झाली. त्या दिशेने माझे पाय वळले.

त्याच्या गाडीशेजारी मी थबकलो, तेव्हा 'क्या चाहिये बाबूजी ?' असे म्हणून त्याने मालाचे गुणवर्णन सुरू केले. 'कोईबी चीज चार-चार आना,' असे पुन्हा पुन्हा तो मला सांगत होता.

धाकट्या बेबीसाठी एखादे खेळणे घ्यावे असे वाटले. गळ्याभोवती रंगीत रेशमी फीत असलेला एक कापडाचा कुत्रा खरेदी केला. बेबीला आकाशी रंगाची आवड आहे, म्हणून फिक्या निळ्या रंगाची मी निवड केली.

पैसे देण्यासाठी मी खिशात हात घातला. बरीचशी चिल्लर हातात आली. त्यातले एक नाणे मी त्याच्यापुढे केले; पण त्याची नजर माझ्या हातातील प्रायमरवर खिळून राहिली होती.

"बाबूजी," म्हणून त्याने मला हटकले. "थोडं ते प्रायमर पाहू देता का ?" असे मला त्याने विचारले.

त्याच्या हाती पुस्तक देत मी म्हटले, "हो, पाहा ना."

त्याने पुस्तकाचे नाव पाहिले आणि मघा तो ज्या पुस्तकात पाहून पाटीवर लिहीत होता, ते पुस्तक त्याने उघडले.

त्यातले एक पान अर्धे फाटले होते. मांझ्याकडून घेतलेल्या पुस्तकात पाहून तो आपल्या वहीत काहीतरी उतरून घेऊ लागला. ते पाहून मी म्हटले, "तू हे काय करतोस ?" त्यावर लिहिता लिहिताच तो मला म्हणाला, "माझ्या पुस्तकातलं हे अर्धं पान फाटलं आहे; तेवढं उतरून घेतो म्हणजे त्यासाठी पुन्हा दुसरं पुस्तक मला विकत घ्यायला नको. माफ करा. तुम्हांला थोडी तसदी देत आहे." असे म्हणून तो पुन्हा भरभर लिहू लागला.

त्याच्या त्या कृतीचे, भाबड्या नि धीट स्वभावाचे मला अतिशय कौतुक वाटले. त्याच्याकडे मी आदराने पाहतच राहिलो. माझ्या मनात एक कल्पना आली आणि मी म्हणालो, "थांब हं, इकडं आण ते



पुस्तक," असे म्हणून त्याला मध्येच अडवून त्याच्या हातून मी पुस्तक घेतले आणि त्याला विचारले, "तुझं नाव काय ?"

"इंद्रजितसिंग."

माझ्या कोटाच्या वरच्या खिशातून मी पेन काढले आणि प्रायमरमधल्या पहिल्या कोऱ्या पानावर लिहिले, 'इंद्रजितसिंग यास सप्रेम भेट'. त्याखाली मी माझे स्वतःचे नाव लिहिले.

माझ्या या कृतीचा त्याला काहीच अर्थबोध होईना. तो मला म्हणाला, "तुम्ही हे काय करता आहात ?"

त्याच्या हाती पुस्तक देत मी म्हटले, "तुला हे पुस्तक भेट म्हणून देत आहे."

"बाबूजी, तसं नको. कुणाकडून फुकट काही घेतलेलं माझ्या आईला खपत नव्हतं."

"मी तुला तसंच देत नाही, भेट म्हणून देत आहे. भेट नाकारायची नसते." मी असा आग्रह केला, तेव्हा ते पुस्तक हाती घेत तो म्हणाला, "फार आभारी आहे मी तुमचा." असे म्हणत त्याने पुस्तकाचा हसत-हसत स्वीकार केला व मला विचारले, "हा कुत्रा तुम्ही कुणासाठी घेतलात ?"

मी म्हटले, "मला एक छोटी मुलगी आहे, तिच्यासाठी."

"आणि हे पुस्तक कुणासाठी घेतलं होतंत ?"

"तिच्याहून दोन वर्षांनी एक मोठी मुलगी आहे, तिच्यासाठी."

"मग तिला माझी एक भेट द्या." असे म्हणून गाडीतला नेताजींचा मुखवटा असलेला एक रंगीत बिल्ला उचलून तो माझ्या हाती देत त्याने विचारले, "तुमच्या बेबीला हा आवडेल ?"

"हो, आवडेल."

"तिचं पुस्तक तुम्ही मला दिलंत ; ती आता तुमच्यावर रागावणार नाही ना ?"

“नाही. तिला मी दुसरं घेऊन देईन. तू कितवीत आहेस ?”

“आताच इंग्रजी शिकू लागलोय, पहिलीत आहे.”

“तुला अभ्यास कर म्हणून कोण सांगतं ?”

“कुणी सांगत नाही. मी एकटाच आहे. आईची फार इच्छा होती, की मी वडिलांप्रमाणं शिकून वकील व्हावं म्हणून ... ”

“शीक, शीक ... मोठा हो !” असा आशीर्वाद देऊन मी निघालो. चालता चालता फिरून एकदा नकळत मी मागे वळून पाहिले. मी दिलेले नवे पुस्तक त्याच्या हाती होते. ते वाचण्यात तो किती गुंग होऊन गेलेला होता !

लेखक - जयसिंग शिंदे

•••

मराठी
बालभारती : इ. ५ वी
पहिली माला : १९७०



# ३. कल्पकतेचे वरदान

तुकाराम नावाचा एक गरीब मुलगा होता. एका म्हाताऱ्या आजीशिवाय त्याला आपले असे दुसरे कुणी नव्हते. आपली शाळा सांभाळून त्याला खूप काम करावे लागत असे.

भल्या पहाटे तो पेपर टाकायला जायचा. शिवाय, दुपारी शाळा सुटली, की दुधाच्या बाटल्या पोचवायचा. त्या पैशांत त्याची फी, पुस्तके, कपडे यांचा खर्च भागे. आजीही थोडा हातभार लावत असे. मेतकूट, भाजणी, पापड असले पदार्थ करून ते ती विकी. त्यांतून त्यांना कशीबशी मीठभाकरी मिळे.

एकदा आजी खूप आजारी पडली. तिला रोजचा भातसुद्धा टाकता येईना. तिथे इतर कामे कशी झेपणार ? सगळा भार तुकारामवर पडला. त्याला घराबाहेर पडणे अशक्य झाले. पहाटे पेपर टाकायलासुद्धा जाता येईना. रोजचे दूधही पोचवता येईना. शाळा सारखी बुडू लागली.

तुकाराम आजीच्या उशाशी बसून तिला गोष्टींची पुस्तके वाचून दाखवी. वाचता वाचता त्याच्या मनात येई – बसल्या बसल्या इथे असे घरी आजीजवळ काही काम करता येईल का ?

एकदा तो याच विचारात गढला असता, त्याच्या हातातील पुस्तकातून एक शुभेच्छा कार्ड खाली पडले. त्याच्या मित्राने ते त्याला पुस्तकातील खुणेसाठी वापरायला दिले होते. ते पाहताच तुकारामला एकदम कल्पना सुचली – अशी भेटकार्डे तयार करून ती विकली तर ... ?

त्याला चित्रे काढता येत होती. त्याने आपली कल्पना आजीला सांगितली. तिलाही ती आवडली.

आजीच्या उशाशी बसल्या बसल्या तो चित्रे रंगवू लागला. सूर्योदय, झाडावरचे पक्षी, प्राणी, निरनिराळ्या रंगांची फुले अशी कितीतरी.

## ४. श्यामची आई

कोकणामध्ये पावसाळ्यात विहिरी तुडुंब भरलेल्या असतात. हातानंसुद्धा पाणी घेता येतं, इतक्या त्या भरतात. पावसाळ्यामध्ये पोहण्याची कोकणात मौज असते. नवीन मुलांना या वेळेसच पोहायला शिकवतात. नवशिक्याच्या कमरेला सुकडी बांधतात व देता त्याला विहिरीत ढकलून ! विहिरीत पोहणारे असतातच. माझे चुलते पट्टीचे पोहणारे होते. वडलांना पोहता येत असे. मला मात्र पोहता येत नव्हतं.

दुसरे पोहत असले म्हणजे मी मजा पाहायला जात असे, परंतु स्वत: मात्र पाण्यात कधी गेलो नाही. मला फार भीती वाटे. आमच्या शेजारची लहान लहान मुलंही धडाधड उड्या टाकत; परंतु मी मात्र भित्री भागूबाई ! 'ढकला रे श्यामला' असं कोणी म्हटलं, की मी तिथून पोबारा करत असे.

माझी आई पुष्कळ वेळा म्हणे, 'अरे श्याम, पोहायला शीक. ती लहान लहान मुलं पोहतात आणि तुला रे कसली भीती ?' एकदा ती म्हणाली, 'उद्या रविवार आहे. पोहायला जा.' मी काहीच बोललो नाही.

रविवार उजाडला. मी कुठंतरी लपून बसायचं ठरवलं. माळ्यावर लपून बसलो. साधारण आठ वाजायची वेळ. शेजारचे भास्कर, बन्या, वासू, बापू हे सारे आले.

''श्यामची आई, श्याम येणार आहे ना आज पोहायला ?'' बन्या म्हणाला.

''हो, येणार आहे; परंतु कुठं आहे तो ? मला वाटलं, की तुमच्याकडंच आहे श्याम. कुठं बाहेर गेला की काय ?'' असं म्हणून आई मला शोधू लागली.

मी वरून सारं ऐकत होतो.



मुलं म्हणाली, ''तिकडं आमच्याकडं नाही बुवा आला. कुठं लपून तर नाही बसला ? आम्ही वर पाहू का, श्यामची आई ?''

आई म्हणाली, ''बघा बरं वर असला तर. त्याला लपून बसायची सवयच आहे. त्या दिवशी असाच माच्याखाली लपून बसला होता, पण वरती जरा जपून जा हो.''

मुलं माळ्यावर येऊ लागली. आता मी सापडणार, असं वाटून भाताच्या कणगीआड मांजरासारखा लपून बसलो.

''नाही रे इथं. तो काय इथं लपून बसेल अडचणीत ?'' एकजण म्हणाला.

''चला आपण जाऊ, उशीर होईल.''

इतक्यात भास्कर म्हणाला, ''अरे, तो बघा ! त्या कणगीपाठीमागं लपलाय.''

झालं, ती मुलं जवळ येऊन मला ओढू लागली; परंतु किती झाली तरी ती परक्यांची मुलं. ती जोर थोडाच करणार ! ती हळूहळू ओढत होती व मी सर्व जोर लावून प्रतिकार करत होतो.

''श्यामची आई, तो काही येत नाही आणि हालतही नाही,'' मुलं म्हणाली.

आईला राग आला. ती म्हणाली, ''बघू दे, कसा येत नाही तो !'' असं म्हणून आई वर आली व रागानं माझा हात धरून तिनं मला ओढलं. ती मला फरफटत ओढू लागली, तरी मी हटूनं बसतच होतो. एका हातानं आई ओढत होती. दुसऱ्या हातानं ती शिंपटीनं मला मारत होती. आई मुलांना म्हणाली, ''तुम्ही हात धरा नि ओढा. मी पाठीमागून हाकलते व झोडपते चांगला ! बघू कसा येत नाही तो !''

मुलं मला ओढू लागली व आई शिंपटीवर शिंपटी देऊ लागली. मी ओरडू लागलो, ''नको ग आई मारू ! आई आई, मेलो !''

''काही मरत नाहीस. ऊठ, तू उठून चालू लाग. आज मी सोडणार नाही तुला. त्या मुली आल्या बघ, तुझी फजिती बघायला !'' असं

म्हणून आईनं जोरानं मारणं चालवलं.

"जातो मी. नको मारू," मी म्हटलं.

"नीघ तर. पुन्हा पळालास तर बघ, घरात घेणार नाही."

"सोडा रे त्याचा हात. तो येईल हो. श्याम, अरे, भिऊ नकोस. एकदा उडी मारलीस म्हणजे तुझा धीर आपोआपच चेपेल. मग आम्ही नको म्हटलं, तरी तू आपण होऊन उड्या मारशील. रडू नकोस." बन्या म्हणाला.

देवधरांच्या विहिरीवर वरवडेकरांचा बाळू व इतर तरुण होतेच. "आज आला का श्याम ? ये रे. मी सुकडी नीट बांधतो हो," असं म्हणून बाळू वरवडेकरानं माझ्या कमरेला सुकडी बांधल्या. विहिरीत खाली दोन – चारजण चांगले पोहणारे होते. मी थरथर कापत होतो. "हं, मार बघू आता उडी," बाळू म्हणाला.

मी आत डोकवी, पुन्हा मागं येई; पुढं होई, पुन्हा मागं होई; नाक धरी, पुन्हा सोडी – असं चाललं होतं.

"भित्रा रे भित्रा ! वेणू, तू मार उडी म्हणजे श्याम मग उडी मारील," वेणूचा भाऊ म्हणाला. वेणूनं परकराचा काचा मारून उडी मारली. इतक्यात एकदम मला कुणीतरी आत लोटून दिलं.

मी ओरडलो, "मेलो, आई ग मेलो !"

मी घाबरलो, पाण्यातील मंडळींच्या गळ्याला मी मिठी मारू लागलो. ते मिठी मारू देईनात.

"आडवा हो असा. पोट पाण्याला लाव व लांब हो. हात हालव," असे मला पोहण्याचे धडे मिळू लागले.

बाळूनंही उडी घेतली व त्यानं मला धरलं. माझ्या पोटाखाली हात धरून तो मला शिकवू लागला, "घाबरू नको. घाबरलं म्हणजे लौकर दम लागतो."

"आता फिरून उडी मार. चढ वर." बन्या म्हणाला. मी पायऱ्या



चढून वर आलो, नाक धरून पुढं-मागं करत होतो, परंतु शेवटी टाकली एकदाची उडी !

"शाबास रे श्याम ! आता आलंच पोहणं. भीती गेली की सारं आलं," बाळू म्हणाला. त्यानं मला पाण्यात धरलं व आणखी शिकवलं.

"आता आणखी एक उडी मार म्हणजे पुरे," सारी मुले म्हणाली.

वर येऊन मी उडी टाकली. एकटाच थोडा पोहलो. माझ्या कमरेला सुकडी होत्या म्हणून बुडण्याची भीती नव्हती. माझा धीर चेपला. पाण्याची भीती गेली. आम्ही सारे घरी जाण्यास निघालो. मुलं माझ्याबरोबर मला पोचवायला आली.

बन्या म्हणाला, "श्यामच्या आई, श्यामनं आपण होऊन शेवटी उडी मारली. मुळीच भ्यायला नाही आणि बरं का, सुकडीवर थोडं थोडं त्याला पोहताही येऊ लागलं."

"अरे, पाण्यात पडल्याशिवाय भीती जात नाही. श्याम, डोकं चांगलं पूस," आई म्हणाली.

मुलं निघून गेली. मी डोकं पुसलं. मी जरा फुरंगटून बसलो होतो. इतक्यात 'श्याऽम' अशी आईनं गोड हाक मारली. मी आईजवळ गेलो व म्हटलं, "काय ?"

आई म्हणाली, "ती दह्याची कोंढी घे. त्यात दही आहे. चाटून टाक. तुला आवडतं ना ?"

"मला नको जा, सकाळी मार मार मारलंस ! आणि आता दही देतेस ?" मी रडवेला होऊन म्हटलं.

आईचे डोळे भरून आले होते. माझं बोलणं आईला लागलं का, असं मनात आलं. आईनं तेलाची वाटी आणली व माझ्या वळांना ती तेल लावू लागली. मी काही बोललो नाही. आई रडवेली होऊन म्हणाली, "श्याम, तू भित्रा आहेस असं का जगानं तुला म्हणावं ?

माझ्या श्यामला कुणी नावं ठेवू नयेत. 'तुमचा मुलगा भित्रा आहे' असं तुझ्या आईला कुणी म्हटलं, तर ते तुला आवडेल का ? ते तुला खपेल का ?''

लेखक - सानेगुरुजी

●●●

मराठी
बालभारती : इ. ५ वी
दुसरी माला : १९८४



# ५. मनातले चांदणे

त्या दिवसापर्यंत बल्लूला आम्ही कोणीच पाहिले नव्हते. रोज भल्या पहाटे आपल्या दाराच्या फटीतून वृत्तपत्राची घडी सरकवणारा कोण असतो, हे आपल्याला कुठे माहीत असते ? आपण जेव्हा गाढ झोपेमध्ये असतो, तेव्हा कोणीतरी हळूच ते वृत्तपत्र आणून टाकते, एवढेच आपल्याला ठाऊक असते; पण अगदी योगायोगाने त्या दिवशी वृत्तपत्रांची गाडी उशिरा आल्यामुळे, रोज आमच्या दाराखालून पेपर सरकवणारा बल्लू आम्हांला भेटला. आम्ही सारे त्याची जशी काही वाटच पाहत होतो. ताजी बातमी वाचण्यासाठी प्रत्येकजण उत्सुक असतो. त्या दिवशी आम्हीही पेपरची वाट पाहत होतो, तेवढ्यात बल्लू दारात डोकावला.

दहा-अकरा वर्षांचे वय, सावळा तजेलदार वर्ण, तरतरीत चेहरा आणि पाणीदार डोळे, चपळ हालचाली ! पेपरची घडी त्याने दारातून आत टाकली, किंचित घुटमळला आणि म्हणाला, ''थोडं पाणी मिळेल प्यायला ?''

आम्ही चहा पीत होतो. मी विचारले, ''चहा पितोस ?''

''नको, पाणी द्या.''

का कुणास ठाऊक, पण मला त्या मुलामध्ये काही वेगळेपणा दिसला. त्याने आत यावे, पाणी प्यावेच – पण आमच्याबरोबर थोडा चहाही घ्यावा, असे मला वाटले. मी त्याला पाणी दिले, ते तो घटाघट प्याला. मग त्याने कपाळावरचा, मानेवरचा घाम खिशातल्या रुमालाने टिपला नि म्हणाला,

''सकाळीच तहान लागली, कारण पेपर टाकण्यासाठी धावत गेलो ना घरोघरी.''

''धावत का जावं ? सावकाश जावं.''

''पेपर उशिरा आले. तुमच्यासारख्या साहेबलोकांना ऑफिसात

जाण्यापूर्वी पेपर मिळायला हवा, म्हणून धावत आलो. झालंच तर मलाही शाळेत जायला उशीर झाला असता...''

''तू शाळेत जातोस ?''

''हो, सहावीत आहे.''

''कुठल्या शाळेत जातोस ?''

''म्युनिसिपालिटीच्या...''

''तुझं नाव काय ?''

''बल्लू.''

''छान आहे तुझं नाव, बल्लू...'' मी त्याचे नाव दोन-तीन वेळा तोंडात घोळवले.

''शाळेतलं नाव बल्लव.''

''पण बल्लूच छान वाटतं.''

बल्लू गमतीदार हसला, तेव्हा त्याचे मोत्यासारखे चमकदार स्वच्छ दात दिसले.

मग बल्लू काखेत पेपरांची चळत घेऊन लगबगीने, जवळजवळ पळतच निघून गेला. जाताना हसत म्हणाला, ''जातो, उशीर होईल.''

नंतर बल्लू सकाळचा दिसला नाही. आम्ही सकाळी उठण्यापूर्वी तो पेपर टाकून निघून जायचा; पण एके दिवशी रविवारी तो अवचित उगवला. दुपारी बाराचा सुमार होता. दूरदर्शनवर पशुपक्ष्यांवर आधारित चित्रमालिका लागलेली होती व घरातील लहानमोठे सर्वजण ती पाहण्यात रंगून गेले होते. तोच बल्लू येऊन तेथे हजर झाला. सगळ्यांबरोबर तोही ती मनोवेधक चित्रमालिका पाहू लागला. चित्रमालिका संपल्यावर मी बल्लूला विचारले, ''बल्लू, तू केव्हा आलास ?''

''आताच ! सगळे प्राणी पाहायला मिळाले. त्यासाठीच मुद्दाम इथं आलो. झालंच तर बिल...'' हातातल्या फायलीतून आमचे पेपरचे बिल काढून माझ्या हाती देत तो म्हणाला.



''तुला आता बिल गोळा करायचं काम मिळालं वाटतं ?'' मी त्याच्या हाती पैसे देत म्हणालो, ''म्हणजे शेटजींनी तुला बढती दिली.'

बल्लू पूर्वीसारखा प्रसन्न हसला. त्याचे हास्य खरोखरच फार सुंदर होते.

''माझं गणित चांगलं आहे. मी हिशेब बिनचूक करतो, म्हणून शेटजींनी हे बिलांचं काम मला दिलं.''

''किती बिलं बनवतोस ?''

''मी पन्नास बनवतो. त्याशिवाय कॉलेजमध्ये शिकणारे आणखी विद्यार्थीही बिलं बनवत असतात.''

''तुला पगार किती मिळतो बल्लू ?''

''शंभर रुपये...'' तो ऐटीने म्हणाला.

''घरी कोण कोण आहेत तुझ्या ?''

''आई, वडील आणि दोन लहान भावंडं. वडील गिरणीत होते, संपात त्यांची नोकरी सुटली.''

जणूकाही मी पुढचे प्रश्न विचारीन हे ओळखून बल्लूने सविस्तर माहिती दिली. आमच्या घरापलीकडे असलेल्या झोपडपट्टीतल्या अनेक गरीब कुटुंबांतील एका कुटुंबातला बल्लू होता. शाळेत जाऊन अभ्यास करत होता. शिकता शिकता मेहनत करून दरमहा शंभर रुपयांचा हातभार घरच्या संसाराला लावत होता. बल्लूने विचारले, ''दर रविवारी मी या वेळेला तुमच्या घरी आलो तर चालेल ?''

''का रे ?''

''ही प्राण्यांची मालिका आहे ना, ती मला खूप आवडते. ती पाहण्यासाठी मी येईन. संपली की निघून जाईन.''

''तुझ्या घराशेजारी कोणाचा टी. व्ही. नाही ?''

''आमच्या वस्तीत एकदोघांकडे आहेत, पण ते दारं लावून घेतात. माझी आई कामाला जाते त्या शेटजींकडे तुमच्या टी. व्ही. सारखाच मोठा रंगीत टी. व्ही. आहे. तिथं एकदा मी आईबरोबर गेलो, तर ते

आईला रागे भरले. म्हणाले, 'मोलकरणीच्या मुलासाठी आम्ही टी. व्ही. लावत नाही !' बोलता बोलता त्याला गहिवरून आले. तो गप्प राहिला.

"ठीक आहे ... तू दर रविवारी येत जा इथं टी. व्ही. पाहायला बल्लू ..."

बल्लूचा चेहरा खुलला. तो आनंदाने उड्या मारतच निघून गेला आणि पुढल्या रविवारी पशुपक्ष्यांवरील चित्रमालिका सुरू होण्यापूर्वी मिनिटभर आधी येऊन हजर झाला. त्या दिवशी कुत्र्यांविषयी माहितीपूर्ण घटनांच्या आधारे एक मनोरंजक कार्यक्रम दाखवला जाणार होता.

टी. व्ही. बंद केल्यावर बल्लू जायला निघाला. जाण्यापूर्वी तो किंचित घुटमळला आणि त्याने हळूच मला विचारले, "तुम्ही लेखक आहात ना ?"

बल्लूचा हा प्रश्न मला अनपेक्षित होता. मी त्याला उलट विचारले, "तुला कोणी सांगितलं ?"

"तुमच्या नावाची पाटी आहे ना दारावर. मी पेपर टाकायला पहिल्यांदा इथं आलो, तेव्हाच ओळखलं होतं. आम्हांला पाचवीला धडा होता तुमच्या 'मोती'चा..."

मला बल्लूचे अधिकच कौतुक वाटू लागले. मी त्याला माझ्याजवळची गोष्टींची, चित्रांची काही पुस्तके भेट म्हणून दिली. तो फारच खूश झाला. म्हणाला, "मला गोष्टी वाचायला खूप आवडतं."

त्यानंतर बल्लू दर आठवड्याला आमच्याकडे टी. व्ही. पाहायला येऊ लागला. अधूनमधून तो बिलाच्या वसुलीलाही येई. हल्ली तो सकाळी पेपरचे वाटप करत नव्हता. त्याची हुशारी पाहून शेटजींनी त्याला, वृत्तपत्रांच्या गाडीतून आलेल्या निरनिराळ्या पेपरांचे विभागवार वाटप करून त्या साऱ्याचा हिशेब ठेवण्याचे अधिक जबाबदारीचे काम दिले होते. बल्लूच्या वयाच्या मानाने ते काम जोखमीचे होते, पण बल्लू ते दक्षतापूर्वक आणि प्रामाणिकपणे करत होता. जेव्हा त्याच्या



वयाची मुले साखरझोपेत असत, तेव्हा बल्लू आपल्या कामात गुंतलेला असे.

टी. व्ही. वर प्रदर्शित होणारी पशुपक्ष्यांवरील मालिका बंद झाली, तरी बल्लू आमच्याकडे अधूनमधून येतच राहिला. आमच्या घरातील सर्वांची त्याच्याशी एक प्रकारची जवळीक निर्माण झाली. एक दिवस मी लिहिलेले एक पुस्तक तो घेऊन आला नि म्हणाला, "किती छान वाटतं हे पुस्तक वाचताना. तुमचं कोकण किती सुंदर असेल नाही ?"

मी म्हणालो, "प्रत्येकाला आपला गाव सुंदर वाटतो. तुझाही गाव असेल ना कुठंतरी ? कोकणात नसला तरी देशावर, मराठवाड्यात, विदर्भात, कुठंतरी तुझ्या आईवडिलांचं खेडं असेलच. तू तिथं गेलास तर तोही मुलूख तुला सुंदर वाटेल."

"आम्हांला गावच नाही," तो उदासपणे म्हणाला. "माझे आईवडील खेडं सोडून मुंबईत आले त्याला खूप वर्षं झाली. माझा जन्म तर इथलाच. डोंगर, नदी, कुरणं, झाडं-वेली...झाडांवर स्वच्छंद रमणारे पक्षी – यांपैकी मी काहीही कधी पाहिलेलंच नाही..." मग थोडा वेळ थांबून एकदम तो म्हणाला, "मला न्याल तुमच्या गावी ? तुमच्या कौलारू घराच्या अंगणात रात्री पडणारं चांदणं मला पाहायचं आहे ! मुंबईत आम्ही कधी पौर्णिमेचं चांदणं पाहिलं नाही..."

"बल्लू, मी तुला नेईन माझ्याबरोबर माझ्या कोकणातल्या गावी. तिथं तुला चांदणं पाहता येईल. चांदण्यात मनसोक्त बागडता येईल."

"खरंच ?" विश्वास न बसल्यासारखे त्याने मला विचारले.

मी म्हणालो, "खरंच !"

बल्लूच्या डोळ्यांत मी त्या वेळी पौर्णिमेचे चांदणे जणू पाहत होतो.

त्यानंतर लवकरच आम्ही घर बदलले आणि दूरच्या उपनगरामध्ये राहायला गेलो. त्या गडबडीत बल्लूला भेटायचे राहूनच गेले. तोही त्या

मुदतीत का कुणास ठाऊक फिरकला नाही. बल्लूला दिलेले वचन माझ्याकडून पूर्ण व्हायचा योग नव्हता.

त्यानंतर बरेच दिवस लोटले. बल्लूच्या आठवणी पुसट होत गेल्या. नवी जागा, नवा परिसर, नवी कामे, नवी माणसे यांत चिमुकल्या थेंबासारखा कधीतरी भेटलेला बल्लू हळूहळू हरवून गेला.

असेच दिवस उलटत होते ... आणि एके दिवशी अचानक बल्लू पुन्हा भेटला !

विद्यार्थ्यांसाठी एका मासिकाने लेखनाची स्पर्धा जाहीर केली होती. अनेक नामांकित शाळांतील विद्यार्थ्यांनी त्या स्पर्धेमध्ये भाग घेतला होता. निर्णय जाहीर झाला. त्या स्पर्धेतील विजेत्या बाल-लेखकांच्या पारितोषिक वितरणासाठी मला संयोजकांनी प्रमुख अतिथी म्हणून बोलावले होते. मी स्पर्धेचा निर्णय पाहिला. पहिले पारितोषिक मिळवणाऱ्या विद्यार्थी लेखकाचे नाव होते – 'कुमार बल्लव कदम' आणि त्याच्या लेखाचे शीर्षक होते – 'मला न भेटलेले अंगणातील चांदणे !'

त्या निबंधावरून मी नजर फिरवली. बल्लवने सुरेख अक्षरांत लिहिले होते –

''माझं एक चिमुकलं स्वप्न आहे – कोकणात किंवा कुठेही मुंबई-बाहेरच्या खेड्यात आपलं एक छोटंसं कौलारू घरकूल असावं. त्याला टुमदार अंगण असावं. त्या अंगणात रात्री चंद्राचं शुभ्र शीतल चांदणं रांगत रांगत यावं – नि मी त्याला कडेवर उचलून घ्यावं !''

बक्षीस घेण्यासाठी बल्लू समोर आला. मघापासून त्याला पाहण्यासाठी मी आतुर झालो होतो. गेल्या तीन – साडेतीन वर्षांनंतर बल्लू किती वेगळा दिसत होता ! अशक्त, उंच आणि हडकुळा. बल्लूला त्याच्या चमकदार, प्रसन्न हास्यामुळे व पाणीदार डोळ्यांमुळेच मी ओळखू शकलो होतो. बल्लूने माझ्या हातून बक्षीस स्वीकारले. मी



त्याच्या पाठीवरून कौतुकाने हात फिरवला. त्याने मला खाली वाकून नमस्कार केला व म्हणाला, ''सर, मला तुमचा पत्ता हवा.''

मी माझ्या पत्त्याचे कार्ड त्याला दिले आणि म्हणालो, ''भेटायला ये या पत्त्यावर. आपल्याला गावी चांदणं पाहायला जायचं आहे ना ?''

पण बल्लू आलाच नाही. त्याऐवजी एके दिवशी त्याचे पत्र आले. त्याने आपल्या सुरेख वळणदार अक्षरांत लिहिले होते – ''प्रिय सर, तुम्ही मला वाचनाची गोडी लावलीत. त्यामुळे मला लिहायची हौस वाटू लागली. तुम्ही चांदणं दाखवायला गावी नेणार होता मला, ते मी विसरलो नव्हतो. त्याचीच गोष्ट लिहिली नि पहिलं बक्षीस मिळालं ! खरं तर हे सारं तुमच्यामुळं ... तुमचे किती आभार मानू ? सर, मी दहावीच्या वर्गात आहे. पण मध्ये खूप घडामोडी घडल्या. माझे बाबा वारले, आई खूप आजारी असते. मी रात्रशाळेत शिकतो. दिवसा नोकरी करतो. आई, भावंडं यांची सारी जबाबदारी आता माझ्यावर आहे. तेव्हा मला तुमच्याबरोबर गावी येता येणं शक्यच नाही. कधीच शक्य नाही.

''सर, काही लोकांच्या आयुष्यात त्यांना उन्हातूनच चालावं लागतं. चांदणं त्यांना भेटतच नाही ! तसंच माझं झालं असेल का ? पण तुम्ही मला मायेनं, आपुलकीनं म्हणजेच माणुसकीनं वागवलं, त्यातच चांदण्याचा एक कवडसा मला भेटला. तो पुरेसा आहे.''

तुमचा नम्र,

बल्लू ऊर्फ बल्लव कदम

मी पत्रावर बल्लूचा पत्ता शोधू लागलो, पण बल्लूने पत्ता लिहिलाच नव्हता !

लेखक - मधु मंगेश कर्णिक

●●●

मराठी -
बालभारती : इ. ६ वी
तिसरी माला : १९९४

## ६. अडाणी

बाहेर अंधार पडत होता. माझ्या दारात दिवा लागला होता. दारात मला गेनूबुवा तराळ दिसताच मी आईला बोललो,

''आये ! दारात तराळ आलाय !'' माझ्या आईनं तराळाला बघताच डोईचा पदर नीट केला. तोच माझ्या 'बा'नं त्यांना पुसलं,

''का वं ! एकाएकी अंधार करून माज्या दारात ?'' मग उभ्या उभ्याच गेनूबुवानं आपल्या दंडकीच्या खिशातून पत्र काढलं. ते माझ्या 'बा'च्या हातात देता देता म्हणाला, ''रामा ! तुझ्या नावावर हे 'पतर' आलंय बघ.'' माझ्या बापानं तो कागद हातात घेऊन उलटा-पालटा करून दाराच्या उजेडात बघितलं. पुढं अंधारात नजर टाकली व अण्णा चितागती झाल्यागत गप्प झाला. माझ्या वडलांना मी 'अण्णा' म्हणत असे.

वास्तविक माझ्या बापाच्या एवढ्या हयातीत त्यांना कुणीच पत्र असं पाठवलं नसावं. त्यांना कोण कशाला पत्र पाठवणार ? काय खबर आली, सांगावा आला, तर माणसाच्या तोंडीच येणार. तोंडातोंडीचा सांगावा हेच खरं पत्र-टपाल ! पण पोष्टकार्डावर लिहिलेलं पत्र माझ्या 'बा'ला कधीच आलं नव्हतं. त्यात माझ्या बापानं सरकारी गावकीचं टपाल, कागदपत्राचा लखोटा गावोगाव पाटील-तलाट्याला, महालकरी-मामलदाराला, हवालदार-फौजदाराला गावकीच्या कामात पोहोचता केलेला होता. त्यातच त्यांनी आपल्या आयुष्याचे दिवस खर्ची घातलेले होते; पण स्वत:ला म्हणून कुणाचं पत्र आलेलं नव्हतं, हे मला घरात दिसत होतं. त्यांना तसं कुणी पत्र-टपाल धाडत नव्हतं, कुणी तसं धाडण्याचं कारणही नव्हतं. त्यात माझी थोरली बहीण पवित्रा नवऱ्याच्या गावी नांदायला होती. पण तिचं काय पत्र येण्याची आशाच नव्हती. आला तर सांगावा, निरोप येणार. त्यात माझ्या बापाची एक मावस बहीण मुंबईला होती. आता तेवढीच बया काय खबर कळवली



तर पत्रानं कळवणार ! पण तिनंही काय कवा मुंबईला असल्यापासून कागद-पत्र धाडला नव्हता. काय तसं कागद पाठवण्याचं कारणही कधी घडलं नसावं, पन काईतरी महत्त्वाचंच असावं अशी ही सगळी वस्तुस्थिती होती. मग गेनूबुवा तराळानं कुणाचा कागद द्यावा ? या विचारात पडून माझ्या वडलानं-अण्णानं लागलीच तराळाला पुसलं,

''काय गा, ह्यो कागद मला आलाय म्हंतूच ?''

''व्हय रं रामा, तुलाच आलाय !''

वडलानं हातातलं पत्र पुन्हा उलटं-पालटं बघितलं. त्याला विचारलं,

''यात माजं नाव, रामा तात्या असं लिव्हलंय ?''

''तर काय ? त्यात तुजा पत्त्यापण हाय !''

''हे पत्र माजंच हाय म्हण की !''

''तर दुसऱ्या कुणाचं न्हाय ! तुजंच हाय बघ.''

त्यात तराळ बोलता बोलता खाली बसला व वडलाला बोलला,

''रामा, जरा चिलीम तरी पेटव !''

मग माझा बाप तंबाकूनं चिलीम भरू लागला. तोवर मी त्याचं बोलणं ऐकून बाहेर आलो. कुणाचं पत्र आलं ? म्हणून ते पत्र हातात घेऊन उलटं-पालटं करून पाहिलं. मी लहान होतो. अडाणीच. शाळेत जात नव्हतो. पत्र पाहून माझी वाचा बंदच. काय वाचणार ? मला वाचताच येत नव्हतं. बापानं – अण्णानं चिलीम पेटवली, एक झुरका मारून तराळाच्या हातात चिलीम देत सहज बोलला, ''व्हय गा ! कुणाचा असावा हा कागद ?''

''कुणाला ठावं ! माझ्या हातात नायकानं दिलं. तेच्यापण हातात पोष्टमननं बाजारात दिलं.''

''पण त्या नायकाला पोष्टमन बाजारात काय बोलला असंल की !''

चिलमीचा झुरका मारून तराळ बोलला,

''आता मला का ते ठावं ?''

"नव्हं ! त्वा त्याला पुसायचं तरी पतरात काय मजकूर हाय तो ?"

"व्हय गड्या ! म्या तसं पुसायचं इसरलो," असं म्हणून तराळ पुढं बोलला,

"पण रामा, तो नायक काय लिवणार हाय व्हय !"

"तेबी ख़रंच हाय ! पण त्यानं डाकवाल्याकडं कागद फोडून-बिडून घेतला तेवढंच इचारायचं !"

माझ्या वडलांच्या हातात चिलीम देत तराळ बोलला,

"व्हय ! तेवढं मातर पुसायला पाइजे होतं खरं !"

अण्णानं माझ्या हातातून पत्र घेतलं. चौकटीत उजेडाच्या बाजूला धरलं. त्यावर नजर टाकली. "या पत्रात काय जास्त लिवलंबी न्हाय !"

"असं म्हंतूय ?" असं आश्चर्यानं बोलून तराळानं ते पत्र हातात घेतलं व चौकटीच्या आत उजेडात, त्यातल्या दोन ओळी बघून तोही चमत्कारिकपणे बोलला, "रामा, तुला कवा नव्हं ते पतर आलं, पण तेबी आर्धंच आलंय ! काही महत्त्वाचा निरोप असंल. आता ते तलाट्याकडं नायतर मास्तराकडं फोडून बघितल्याशिवाय कसं कळायचं ?"

"तेबी खरंच ! अत्ताच्या अत्ता तलाट्याकडं-कुलकर्ण्याकडं जातो !"

"अरं रामा ! कुलकर्णी गावात न्हाय !"

"मग गावातल्या मास्तराकडं सकाळी जाऊन त्या मास्तराला गाटतो !"

सकाळी अण्णा हातात पत्र घेऊन निघाला. मीही त्याच्या पाठोपाठ निघालो. तोच आईनं आवाज केला, "कुठं वं चाललाय ?"

"अग, आलेलं पत्तर तरी वाचून येतो गावात." मग आई गप्प झाली.

आम्ही मास्तरांच्या दारात गेलो. बाहेरच्या सोप्यात कोणीच दिसेना,



म्हणून अण्णानं आत हाक दिली, "मास्तर हायेत का घरात ?" त्याबरोबर आतून उलटा आवाज आला, "कोण आहे रं बाहेर ?"

"मी रामा हाय जी !"

असा अण्णाचा आवाज आत शिरल्या शिरल्या मास्तरीणबाई चटाचटा पाऊल टाकत बाहेर आली.

"आहो, आत काय करताय तुम्ही ? दारात रामा ऐताच आलाय. पावसाचे दिवस ... चार लाकडं तरी फोडून घ्या ! आता स्वैपाकाला सरपण नाही !"

असं मास्तरीणबाई आत तोंड करून बोलली व पुन्हा अण्णाला म्हणाली,

"आरं ! आमचं बघ सरपण संपलंय ! लाकडाच्या चार ढलप्या तरी काढून दे ! त्यात पावसाचं दिवस !"

अण्णा गप्प झाला ... आता अण्णाच्यापुढं प्रश्न होता ... मास्तरांच्याकडून पत्र वाचून घ्यायाचं होतं. त्यांच्याशिवाय खडाखडा पत्र फोडणार कोण ? त्यांच्या दारात तर पत्र घेऊन आलो. पत्र तर वाचून घेणं भाग होतं.

"काय रामा ! का सकाळीच दारात ?" मास्तरांनी बाहेर येऊन विचारलं.

"व्हय ! तसं कामच पडलंय !"

"कसलं काम काढलंय रामा ?"

"तसं काय भारी न्हाय !" असं म्हणून दंडकीच्या खिशातलं पत्र काढून हातानं पुढं करून तो म्हणाला, "हे पतर आलंय, तेवढं फोडून दावायचं हाय !"

ते पत्र मास्तरांच्या हातात टाकणार तो मास्तरांनी लागलीच आपलं काम सांगितलं,

"आरं रामा ! स्वैपाकाचं घरात थटलंय ! लाकडाच्या चार ढलप्या

तरी तेवढ्या काढून दे !''

''मी त्याला कुठं न्हाय म्हंतोय !'' असा अण्णाचा होकार आलाच. अन् तो सरळ पुढं बोलला, ''द्या की कुऱ्हाड तेवढी. चार फाळ्या काढून देतु.'' अण्णाच्यापुढं दुसरा मार्गच नव्हता. त्याला पत्र वाचून घ्यायाचं होतं ...

अण्णानं कुऱ्हाडीचं नाव काढताच मास्तर लागलीच सोप्यातूनच आत गेले ... माळीच्या चौकटीतून आत बायकोला हाक मारली,

''आगं, ती आपली कुऱ्हाड कुठाय ? रामाकडून आजच्यापुरत्या चार ढलप्या काढून घेतो !'' त्याबरोबर आतून उलटा आवाज आला, ''आहो ! आजच्यापुरत्या काय बोलताय ! चार-आठ दिवस पुरेल एवढं तरी त्याच्याकडून सरपण फोडून घ्या. तो ऐताच घावलाय ! त्यात पावसाचं दिवस !''

अण्णाच्या कानांवर मास्तरीणबाईंचे शब्द पडले. मग तो वैतागातच स्वत:ला बडबडला –

'तुज्या घरचा नोकर नव्हं का ! बरा घावलो तावडीत !'

अण्णाला वैताग येण्यासारखाच हा प्रसंग होता; पण त्याच्यापुढं आता काही इलाज नव्हता.

त्यात आम्हांला दोनच डोळं. पण मास्तर शिकल्यानं ते आता चार डोळ्यांचे झाले होते. कधीही नडी-आडीला असंच काय वाचून घ्यायला त्यांच्या दारात पुढं जाण्याचा प्रसंग येणारच !

तेवढ्यात मास्तरांनी जडशीळ कुऱ्हाड आणून पुढं अंगणात धापकन टाकली व अण्णाला बोलले,

''रामा ! भराभरा चार दिवसांचं सरपण फोडून दे !'' तोच अण्णानं हातातलं पत्र मास्तरांच्या हातात वरून टाकलं. ''मास्तर अगोदर तरी वाचून दावा मला !''

मास्तरांनी पत्र हातात धरून त्यावर नजर टाकली. तोच ते वडलाला म्हणाले,



''रामा, मी अंघोळ करून आलोच. पाणी थंड होईल. मग तुझं पत्र वाचून दावतो, बरं का !''

पत्र वाचून घेण्यासाठी लाकडं फोडण्याची वेळ माझ्या 'बा'वर – अण्णावर आली होती.

अण्णा लाकडं फोडू लागला. पत्रात काय असेल याचे विचार मनात दाटत होतेच. लाकडं फोडून झाली, पण त्यात बराच वेळ गेला.

मग अण्णानं आत हाक दिली,

''मास्तर ! आहो मास्तर !!'' त्याबरोबर मास्तर आतून बाहेर आले. त्यांनी लागलीच विचारलं,

''काय रामा, झाली का लाकडं फोडून ?''

''तो बघा की फोडलेल्या लाकडांचा ढीग !''

त्या ढिगाकडं पाहून मास्तरांनी अण्णाला शाबासकी दिली.

अण्णा लगेच म्हणाला, ''आता तरी ते पत्र वाचून दावा !'' मास्तरांनी त्यावर नजर फिरवली व विचारलं,

''अरं रामा, तुझी बहीण मुंबईला होती का ?''

''व्हय होती ! मावस भण धोंडाबाय ! घरातल्यावानीच !''

''अरं तिला देवआज्ञा झाली. तुझी सारखी आठवण काढत होती.''

अण्णा कळवळला !

''आरं देवा ! माझी धोंडाई गेली म्हंता ... ?''

अण्णा गप्प गप्प झाला. मोठ्या जुलमानं, खाली मुंडी घालून, मास्तरांच्या पायरीवरून उठला. खाली मान घालून वाड्याबाहेर पडला. वाटेला लागल्यावर त्यानं पाणावलेले डोळे पुसले...

लेखक – शंकरराव खरात

●●●

मराठी
बालभारती : इ. ६ वी
तिसरी माला : १९९४

# ७. दौलत

'नाही' हा शब्द दौलतने मोठ्या निर्धाराने उच्चारला. तो शब्द ऐकून तात्या देशमुखांनी झटक्याने मान फिरवली अन् ते रागाने चालते झाले.

ते तसे गेल्यावर मात्र दौलतच्या मनाला प्रश्न पडला, आपण केले हे बरोबर की चूक ? तात्या देशमुख गावातले वजनदार देशमुख तर होतेच, शिवाय दौलतचे उपकारकर्तेही होते. त्या दिवशी घरात नदीचे पाणी शिरल्यावर मोठ्या मेहरबानीने तात्यांनी त्याला आपल्या जुन्या वाड्यात राहायला जागा दिली होती. गेले पंधरा दिवस तो तेथे राहत होता. घरातील ओल पूर्ण सुकेपर्यंत म्हणजे आणखी महिनाभर तरी त्याला त्यांच्या वाड्यात राहणे भाग होते.

अशा स्थितीत ते आपल्याकडे येतात, मुलांना स्टेशनपर्यंत पोचवण्यासाठी गाडी जुंपायला विनवतात आणि आपण त्यांना 'नाही' म्हणतो, हे बरोबर की चूक ?

एक प्रकारे ते बरोबर होते.

आज पोळ्याचा दिवस ! बैलांचा वर्षातला सणाचा दिवस ! या दिवसाचे महत्त्व शेतकऱ्याशिवाय इतरांना कधीच कळायचे नाही. बारा महिने तेरा काळ मातीत खपून मोती पिकवणाऱ्या बैलाची या दिवशी शेतकरी पूजा करतो, त्याला गोडधोड खायला घालतो, रंगवतो, झूल घालतो आणि हौसेने त्याची मिरवणूकही काढतो. वर्षभर खपून जगाला जगवणाऱ्या बैलाला फक्त आजचा एकच दिवस विसावा मिळत असतो. अन् अशा दिवशी तात्या येऊन म्हणत होते, 'माझ्या मुलांना सिनेमा बघायला सांगलीला जायचंय, तेवढं त्यांना गाडीतून स्टेशनपर्यंत पोचव !'

कसे शक्य होते ते ? जातिवंत शेतकरी पोळ्याच्या सणादिवशी बैलाला कधीही जुंपणार नाही. अर्थात आपण 'नाही' म्हटले हे बरोबरच



केले, असे दौलतला वाटले.

पण तात्या गावातला श्रीमंत, प्रतिष्ठित माणूस. आपण त्यांच्या घरात राहून मिंधे झालेलो. अशा स्थितीत आपण नाही म्हणणे म्हणजे त्यांचा केवढा अपमान झाला ! त्या अपमानामुळेच ते रागाने निघून गेले. त्यांना जो राग आला तो जसा त्यांच्या अपमानाचा, त्याचप्रमाणे आपण त्यांना 'नाही' म्हणाल्याने आपल्या दिसलेल्या उद्दामपणाचाही ! ते आपणाला आज उद्दाम, उर्मट असेच म्हणत गेले असतील !

पण आज आपण काही जाणूनबुजून उद्दामपणा केला नाही. उर्मटपणा तर नाहीच नाही. आपण आपला धर्म पाळला. माझ्या वागण्याने त्यांना राग आला, तर त्याला मी तरी काय करणार ? खरे म्हणजे तात्यांनी असे रागवायलाच नको होते; पण ही श्रीमंत माणसे, चार पैशाच्या किंवा प्रतिष्ठितपणाच्या जोरावर सगळ्या जगावर सत्ता गाजवू पाहणारी. ही अशीच असायची ! पण त्यांना कोण भितो ?

या विचाराने दौलतचे मन शांत झाले अन् तो हौसेने बैलांना झुली घालून सजवायच्या कामाला लागला.

त्याने चमकदार रंगाने बैलांची शिंगे रंगवली. त्यांवर सोनेरी बेगडाच्या आडव्या पट्ट्या लावल्या. त्यांच्या कपाळावर आरशांची बाशिंगे बांधली, गळ्यात फुलांच्या माळा घातल्या आणि अशा तऱ्हेने सुशोभित केलेल्या आपल्या बैलांकडे तो कौतुकाने पाहत राहिला. त्या कौतुकाने मन भरून आल्यामुळे त्याच्या मनाच्या यातना बुजून गेल्या. तात्या आपल्यावर रागावून गेले याची तर त्याला पुसट आठवणही राहिली नाही.

आपल्या सजवलेल्या बैलांकडे पाहताना त्याचे मन सुखाने पुरेपूर भरून गेले.

**त्याचवेळी** त्याला कुणीतरी येऊन बातमी सांगितली – 'बळी चव्हाणाला बैलानं मारलंय. मोठी जखम झालीय !' ते ऐकताच त्याचे मन अस्वस्थ झाले.

बैलांच्या मिरवणुकीची वेळ होत आली होती. खोताच्या वाड्यापुढे वाजणारी सुरेल सनई त्याला स्पष्ट ऐकू येऊ लागली. बैलांना घेऊन जायची त्याची सगळी तयारी झाली होती, पण त्याचे त्याकडे लक्षच लागेना. सनईचा आवाज त्याच्या कानांत शिरेना. आपले सजवलेले बैलही त्याला स्पष्ट दिसेनात. त्याला एकच देखावा दिसत होता, एकच आवाज ऐकू येत होता – जखमेने रक्तबंबाळ झालेला बळी चव्हाण, अन् त्याच्या मुखातून निघणारा वेदनामय व्याकूळ उद्गार !

बळी त्याचा सगासोयरा नव्हता, भाऊबंद नव्हता, इष्टमित्र नव्हता. तो गावातला एक त्याच्याचसारखा सामान्य शेतकरी होता.

पण मानवी मन हे फक्त नात्याच्या किंवा मायेच्या माणसासाठीच व्याकूळ होत नाही, तर कुठल्याही मानवी दुःखाने ते घायाळ होते. बेचैन होते, बधिर होते.

बळीला पाहण्यासाठी दौलतचे मन अधीर झाले. त्याने शृंगारलेले बैल तिथेच सोडले. मिरवणुकीला उशीर झाला तरी हरकत नाही, असे त्याला वाटले. तो निघाला बळीला बघायला.

बळीला बघायला लोकांची गर्दी झाली होती; पण ती नुसती बघ्यांची गर्दी असे दौलतला वाटले. प्रत्येकजण हळहळत होता. 'दवाखान्यात न्यायला पाहिजे, डॉक्टर बोलवायला पाहिजे', असे प्रत्येकाच्या तोंडातून निघत होते, पण ते करायला एकही धजत नव्हता. त्या गर्दीला बाजूला सारून दौलत बळीजवळ गेला. बळीच्या मांडीत शिंग घुसले होते. रक्तस्राव भलताच झाला होता. फेट्याने त्याची मांडी आवळली होती, तरी अजून रक्त ठिबकत होतेच. भलत्या रक्तस्रावाने बळीला मूर्च्छा आली होती. त्याची म्हातारी आरडत-ओरडत होती अन् त्याचा भाऊ त्याला धरून बसला होता. अशा तऱ्हेने वेळ घालवणे म्हणजे बळीला मृत्यूच्या दाढेत लोटण्यासारखेच होते. ते ध्यानात येताच दौलत बळीच्या भावाला म्हणाला, ''असं बसून कसं



भागणार ? आताच्या आता डॉक्टरला आणलं पाहिजे, नाहीतर याला मिरजेला नेला पाहिजे.''

''मिरजेलाच न्यावं म्हणतोय, पण अजून गाडी जुंपून आली नाही !''

''कोण गेलंय काय गाडी आणायला ?''

''गेलेत दोघंजण, पण ते तिकडंच !''

''अरे, हे का दिरंगाईचं काम ? चारची गाडी आता येईल. गाडी जुंपून चालायलाच हवं आता लगेच स्टेशनकडे ! थांब, मीच येतो माझी गाडी घेऊन दोन मिनिटांत !''

असे बोलून उतावळीने दौलत घराकडे पळत आला. पोळा, मिरवणूक, बैलांचा शृंगार सगळे सगळे विसरला. लवकरात लवकर बळीला स्टेशनवर कसे पोचवावे ही एकच गोष्ट त्याच्या मनात थैमान घालू लागली.

बैलांच्या झुली काढण्यातसुद्धा वेळ दवडणे त्याला बरे वाटले नाही. झुलीसह तसेच बैल त्याने गाडीला जोडले. गाडी बळीच्या दारात नेली. गाडीत एक तढव अंथरला आणि तिघा-चौघांनी बळीला अलगद उचलून गाडीत घातले. गाडी स्टेशनच्या रस्त्याला लागली.

स्टेशनपर्यंतचे अंतर भराभरा कमी होत चालले. पण स्टेशन येईपर्यंत गाडी चुकेल की काय, ही एकच काळजी दौलतच्या जिवाला लागली होती. अखेर जेव्हा स्टेशन आले, अन् गाडीला अवकाश आहे असे कळले, तेव्हा त्याचा जीव भांड्यात पडला.

मग सावकाश बळीला बैलगाडीतून उतरून स्टेशनात नेले. त्याच्या बरोबर मिरजेस जाण्यासाठी दोघा-तिघांची योजना झाली. तेवढ्यात स्टेशनात गाडीही आली. बळीला व्यवस्थित चढवून बसवला गेला. गाडी निघून गेली. नंतर दौलत स्टेशनबाहेर पडून आपल्या गाडीजवळ आला अन् त्याने निवांतपणे पानाची चंची सोडली.

आता पान खाऊन तो परत जायला निघणार होता. त्याने सुपारी कातरून तोंडात टाकली, तोच तात्या आपल्या गावाकडे पायी चालू लागलेले त्याला दिसले. त्याबरोबर त्याला आठवले, तात्या मुलांना पोचवायला आलेले दिसतात. कसे बरे आले असतील ? मुलांना घेऊन चालतच आलेले असणार ! त्याशिवाय काय मार्ग होता ? अरे, येताना आपल्याला धांदलीत ते सुचलेच नाही. सहजासहजी त्यांच्या मुलांना आपल्याला गाडीतून आणता आले असते. त्यांचा राग घालवता आला असता. हं ! चुकलेच सगळे. असो, आता तरी त्यांना बोलवावे, म्हणून तो चंची सावरत उठला. दोन पावले त्यांच्याकडे गेला. त्याने हाक मारली, "तात्या ! अहो तात्या !"

तात्यांनी वळून त्याच्याकडे पाहिले, निखाऱ्यासारख्या लाल डोळ्यांनी ! ती नजर बघताच दौलत बावरला.

तात्यांनी विचारले, "काय ?"

"केव्हासं आलासा ?"

"कशाला हवी तुला ती चौकशी ? अन् होरे, आज बैलांचा सण आहे ना ? गाडी जुंपायची नव्हती ना ?"

"पण बळीला भारीच जखम झाली होती. त्याला मिरजेला नेणं जरुरीचं होतं. सण कवाबी करता येईल ; पण बळीचे प्राण गेले असते तर ?"

तात्या चमकले व झरझर निघून गेले.

लेखक - म. भा. भोसले

•••

मराठी
बालभारती : इ. ६ वी
तिसरी माला : १९९४



# ८. ठोकळ्याचे चित्र

दोन टोल वाजले. तिसरा तास सुरू झाला. ड्रॉइंगचे मास्तर वर्गात शिरले. मुलांनी पुस्तके मिटून पिशव्यांत ठेवली. ड्रॉइंगच्या वह्या बाहेर काढल्या. मास्तरांनी पेन्सिली वाटल्या. काही पेन्सिलींची टोके मोडली होती. चाकू घेऊन मुले ती तासू लागली.

मास्तरांनी टेबलावर एक ठोकळा ठेवला होता. चौकोनी ठोकळा होता तो. मान वळवून एक – दोनदा त्यांनी त्याच्याकडे पाहिले. ठोकळा जरा तिरपा केला. त्यांना समाधान वाटले.

"हं करा सुरवात ! हा ठोकळा काढायचा आज. नीट बघा याच्याकडे ! एक डोळा मिटा व पेन्सिलीने माप घ्या याचे. रेघा बारीक काढा. खोडाखोड करू नका. पट्टीने आखायचे नाही. हाताने रेघा काढायच्या !"

मुलांनी एक डोळा मिटून पेन्सिली नाकासमोर धरल्या. माना वाकड्या करून ती ठोकळ्याचे माप घेऊ लागली. मास्तर वर्गाच्या कोपऱ्यात उभे राहिले आणि ठोकळ्याकडे ऐटीने पाहू लागले. मधून मधून मुलांकडेही ते पाहत होते.

"मास्तर, मी फूल काढू ?" मागच्या बाकावरचा एक हडकुळा मुलगा उठला व त्याने भीत भीत विचारले.

"कोण म्हणतो फूल काढू ? ठोकळा सांगितला आणि फूल काढू म्हणतो ? बस खाली, ठोकळा काढ !"

मुलगा वरमून खाली बसला. नाकापुढे त्याने पेन्सिल धरली व तो ठोकळ्याचे माप घेऊ लागला. त्याचा हात थरथर कापत होता. तेवढ्यात दुसऱ्या बाजूच्या एका मुलाने तक्रार केली.

"मास्तर, हा ठोकळा काढत नाही. त्याने दुसरेच काहीतरी काढले आहे."

"कोण ठोकळा काढत नाही ?" मास्तरांनी विचारले.

"मास्तर, हा दत्तू साने !" तक्रार करणाऱ्या मुलाने बोटाने दाखवले.

घाबरलेल्या डोळ्यांनी दत्तू साने भिरभिर पाहू लागला. वहीच्या पोटात त्याने चटकन चित्र लपवले आणि पेन्सिल नाकासमोर धरून तो मास्तरांकडे बघू लागला.

मास्तरांच्या नजरेतून ते निसटले नाही. डोळे गरगर फिरवत ते त्याच्याकडे पाहू लागले. त्यांनी वही उचलून घेतली व आतून एक चित्र बाहेर काढले.

"तू काढत होतास हे चित्र ?" मास्तरांनी विचारले.

दत्तू बोलला, "होय". तो शरमून खाली पाहत होता. त्यानेच चित्र काढले होते ते. सबंध सकाळ त्याने त्यासाठी घालवली होती व वर्गात पुरे केले होते त्याने ते.

एका झाडावर पोपट बसला आहे. खाली हिरवेगार गवत आहे. अधूनमधून फुले उमललेली आहेत. जवळून एक ओढा वाहत आहे, पाठीमागे डोंगराआडून सूर्य उगवत आहे असे चित्र होते ते. दत्तूने कशातूनही न पाहता ते काढले होते. असे चित्र त्याने पूर्वी कधी काढले नव्हते. इतका आनंद त्याला पूर्वी कधी झाला नव्हता.

पहिल्या दोन तासांत त्याने चित्राकडे कितीतरी वेळा चोरून पाहिले होते. आज त्याला त्या चित्रावाचून काही सुचत नव्हते.

ड्रॉइंगच्या तासाला त्याने ते थोडे अपुरे राहिलेले चित्र पुरे केले होते. मास्तरांनी ते चित्र हातात घेतले. त्या चित्राकडे पाहून त्यांनाही फार आनंद झाला.

"खरंच दत्तू, हे चित्र तू काढलंस ?"

"हो", दत्तूने लाजत उत्तर दिले.

मास्तरांनी आपल्या हातांनी दत्तूच्या पाठीवर शाबासकी दिली.



नंतर मास्तरांनी वर्गाच्या सेक्रेटरीला हाक मारली आणि दत्तूने काढलेले चित्र फळ्यावर टांगून ठेवण्यास सांगितले. वर्गातली मुले आश्चर्याने थक्क झाली. दत्तू सान्याची चहाडी सांगणाऱ्या मुलाने तर 'आ' वासला ! दत्तू सान्याचे चित्र फळ्यावर टांगले गेले. मास्तर टेबलापाशी गेले. क्षणभर खिडकीतून बाहेर पाहत त्यांनी कसला तरी विचार केला आणि हाक मारली, "दत्तू, इकडे ये."

दत्तू अजूनही शरमून एक पाय बाकाच्या दांडक्यावर टाकून वाकडातिकडा उभा होता. मास्तर का हाका मारत आहेत हे त्याला कळेना. तो तसाच उभा राहिला.

"दत्तू," मास्तरांनी पुन्हा हाक मारली.

"काय ?" दत्तू जागेवरून म्हणाला.

"इकडे ये."

दत्तू साने मास्तरांच्या टेबलाजवळ आला. मास्तर त्याच्याकडे पाहून हसले.

"बस ह्या खुर्चीवर," मास्तरांनी आपल्या खुर्चीकडे बोट दाखवत म्हटले.

वर्गात एकच हशा पिकला ! दत्तू साने जास्तच शरमला.

"खुर्चीवर बस म्हणून सांगितले ना ?"

दत्तू मुळूमुळू रडू लागला.

मास्तरांनी तिकडे लक्ष दिले नाही. अशात दोन मिनिटे गेली. दत्तूचे रडणे चालूच होते. अखेर मास्तरांनी रडक्या दत्तूला बळेच आपल्या खुर्चीवर बसवले. दत्तू खुर्चीच्या हातांवर आपले हात टाकून बसला. त्याचे मुळूमुळू रडणे चालूच होते. वर्गात हशा व गडबड जोरात चालू होती. मास्तरांनी आपली नजर एकदा वर्गावरून फिरवली व वर्गात एकदम शांतता पसरली. मास्तर फळ्याजवळ गेले आणि म्हणाले, "खरंच, किती सुंदर चित्र काढलं आहे दत्तूनं ! पोपटाची चोच अगदी

खऱ्यासारखी आहे.''

मुलांनीही त्या चित्राची स्तुती चालवली. मास्तरांनी मुलांना पुन्हा एकदा गप्प केले आणि म्हणाले, ''चित्र खरंच सुंदर आहे आणि दत्तूच्या वयाच्या मानानं तर ते फारच छान साधलं आहे ! पण मुलांनो, चित्राच्या संबंधाने काय चूक आहे ती सांगा पाहू ?''

बरीच मुले उत्तर देण्यासाठी उतावीळपणाने उठली. मास्तरांनी दत्तू साऱ्याकडे हसून पाहिले.

दत्तूने आपले रडे आवरले, डोळे पुसले आणि तो खुर्चीवरून धीटपणाने उठून उभा राहिला आणि म्हणाला, ''मी सांगू ?''

''सांगतोस ? सांग पाहू.''

''हेच चित्र जर मी सगळं घरी काढलं असतं आणि तासाच्या सुरवातीला अगर तास संपल्यावर मी तुम्हांला दाखवलं असतं तर ते चांगलं झालं असतं. आपण ठोकळ्याचं चित्र काढायला सांगितल्यावर मी शिस्त म्हणून ठोकळ्याचं चित्र काढायला पाहिजे होतं !'' साने अडखळत म्हणाला.

''दत्तू, तू खरा शहाणा आहेस. तू काढलेल्या या पोपटाच्या चित्रापेक्षा तू आता दिलेलं उत्तरच फार चांगलं आहे !'' असे म्हणून मास्तरांनी आपले खिसे चाचपले. त्यातून किल्ल्या बाहेर काढल्या व आपले कपाट उघडून त्यांनी चित्रांचे एक पुस्तक बाहेर काढले. त्या पुस्तकावर दत्तूचे नाव लिहून त्याला बक्षीस दिले.

दत्तू आनंदाने उड्या मारत ते पुस्तक घेऊन आपल्या जागेवर जाऊन बसला.

नंतर मास्तर म्हणाले, ''मुलांनो, मुलांना त्यांच्या कलाप्रमाणे शिक्षण द्यावं असं म्हणतात, हे ठीक; पण दत्तू साऱ्याने हे चित्र वर्गात काढलं याबद्दल जर त्याला जाणीव दिली नसती तर उद्या त्या शेजारच्या बापटानं मोराचं चित्र काढलं असतं, कुणी आंबे काढले



असते आणि मी काढायला सांगितलेलं ठोकळ्याचं चित्र अखेर माझं मलाच काढावं लागलं असतं !'' इतक्यात तास संपल्याची घंटा झाली.

''दत्तू, ते फळ्यावरचं चित्र घेऊन जा !'' मास्तर म्हणाले. दत्तूने पाय उंच करून फळ्यावरचे आपले पोपटाचे चित्र काढून घेतले.

मास्तर त्याच्याकडे पाहतच होते. दत्तूने त्या चित्राकडे एकदा पाहिले. त्याचे डोळे पाण्याने भरून आले. त्याने आपल्या मनात कसला तरी कठोर निश्चय केला. आपल्या हाताने त्याने ते सुंदर चित्र फाडून टाकले. मास्तर म्हणाले, ''हे काय केलंस दत्तू ?''

''मी उद्या घरी असंच चित्र काढीन. आतापेक्षा चांगलं येईल ते. मी उद्या पुन्हा तुम्हांला दाखवीन.''

''शाबास ! मी ते फ्रेम करून वर्गातच लावून ठेवीन.''

मास्तरांना दत्तू साऱ्याचा अभिमान वाटला.

लेखक - य. गो. जोशी

•••

मराठी
बालभारती : इ. ६ वी
तिसरी माला : १९९४

# ९. आई

आईला शेतात जायचे होते. त्या घाईने ती थंड्या पाण्याच्या भाकरी करत होती. पिठाचा उंडा मळताना एकीकडे मला हलकेच म्हणत होती, "काशा, तुला तर आज सुटीच असेल, नाही रे ?"

"हो, का ?"

"तर मग आजचा दिवस माझ्याबरोबर चलतो काय ?"

आईचा उद्देश मला बोचला. नकळत माझ्या सुरात तो डोकावला – "कुठं ग ?"

"मी म्हणत होते की —" आई मुद्दाम माझ्याकडे न बघता तव्यावरची भाकरी कोरताना म्हणाली, "माझ्याबरोबर निंदायला चलशील तर बरं होईल. एखादी पाथगीत घेऊ लागशील. तितकाच तेला-मिठाला आधार होईल."

आईचे संपायच्या आतच मी बोललो, "पण मला निंदता येत नाही ना ग ?"

"निंदायला काय वेदमंत्र लागतात रे ? मी सांगेन तुला कसं निंदायचं ते !"

"माझ्याकडून होईल ?"

"जेवढी होईल तेवढीच तू निंद. उरलीच तर मी घेऊ लागेन. झालं आता ?" मीही बोललो, "पण मला अभ्यास करायचा आहे ना ग !"

"अस्सं ?" आता आईनं एकदम माझ्याकडे डोळे फिरवले. सूर ताणून विचारले,

"प्रत्येक सुट्टीच्या दिवशी तू अभ्यासच करत असतोस, नाही रे ?"

"आतापर्यंत नाही केला; पण आजपासून करत जाईन. मास्तर म्हणाले, की आता परीक्षा जवळ आली. जो अभ्यास करणार नाही,



तो नापास होईल – "

माझं संपायच्या आत हातावरची भाकर तव्यावर आपटताना ती म्हणाली, "मला चतुराई शिकवतो काय रे ? अजून मी बोळ्यानं दूध पीत नाही – समजला !"

मी जीव तोडून म्हणालो, "जा. तुला खोटंच वाटतं नेहमी – सगळं !"

माझे न ऐकता ती लगेच एकेरीवर येऊन पुटपुटू लागली, "चल, माझ्याशी एक अक्षर बोलू नको ! आता पाहते ना तुझी मजाच ! मग समजेल, आजपासून कुठं खाशील ते !"

हे सुरू असताना माझ्या पुढ्यात त्या दिवसाचे भवितव्य नाचू लागले. मी वेळीच सावरते घेतले, "बरं, येईन आजच्या दिवस !"

पण वेळ निघून गेलेली होती. आई एकदम म्हणाली, "काही नको येऊ-बिऊ. माझ्यावर फालतूच उपकार कशाला करतो ?"

यावर मीही ताठरलो. माझ्या ओठात राग थरथरू लागला, पण बाहेर डोकावण्याचे धाडस त्याच्यात नव्हते.

आईही बेपर्वा राहिली. घाईघाईनं दीड भाकर, वरणाचा पेंड व अघळपघळ चटणी घेऊन तिने लुगड्याच्या पदरात शिदोरी बांधली. सुभद्रेची भाकर तिच्या सुपूर्त करून ती सरस्वतीकडे ठेवायला सांगितली. उरलेल्या भाकरी दुरडीत एकावर एक रचून ठेवल्या. आईला दुरडीवर झाकण ठेवताना पाहून सुभद्रा माझ्या खुणावण्यानं म्हणाली, "आई, काशाला काही खायचं ठेवलं नाही काय ?"

"गप्प बैस ना, नाहीतर तुलाही ठेवीन तशीच कडावर !"

यावर सुभद्रा भांबावल्यागत झाली. आळीपाळीने आईकडे अन् माझ्याकडे नुसती पाहत राहिली. आई काही बोलली नाही. एका हाती शिदोरी व दुसऱ्या हातात कुलूप घेऊन बाहेर पडताना ती मला म्हणाली, "हं, चला रावसाहेब, निघा बाहेर."

मीही मुकाट्याने बाहेर पडलो. तिने कुलूप घेतले. सुभद्रेने आपली भाकर घेऊन सरस्वतीच्या घराची वाट धरली. दाराच्या नाकात कुलपाची नथ अडकवून झाल्यावर आईने माझ्याकडे पाहत, निर्वाणीने विचारले, ''मग, नाही चलत ना निंदायला ?''

यावर का कुणास माहीत, आई नरमली अन् त्या भरवशावर मी ताठरू लागलो. मला बोलायला उशीर झाला आणि तिथेच माझी भयंकर चूक झाली. कारण पुढच्याच क्षणी आई धमकीने म्हणाली, ''असं आहे तर मग ! नाही ?''

आणि ती शेताच्या वाटेने चालू लागली. पाहता पाहता वाऱ्यासारखी दिसेनाशी झाली. माझ्या बुबुळांवर अश्रूंचा तगर तरंगला. भान विसरून मी आईची कोरी वाट न्याहाळत राहिलो. बराच वेळ गेला. हे बघत असलेल्या सुभद्रेचा चेहरा केविलवाणा झाला. ती मला म्हणाली, ''काशा, आईनं तुझ्यासाठी जेवायला नाही ठेवलं काय रे ?''

मी चिडून म्हणालो, ''न ठेवू दे नाही ठेवलं तर !''

जरा वेळाने सुभद्रेला भूक लागली. मी मनातून याचीच वाट पाहत होतो. आपली भाकर खाताना सुभद्रा मला म्हणाली, ''काशा, येरे आपण जेवू !''

''भाकर तर थोडीशीच आहे,'' मी उगीचच म्हणालो.

''असू दे. अर्धी अर्धी वाटून खाऊ.''

''नाही बा.''

''का रे ?''

''तू आईला सांगशील, पोट्टे !''

''नाही सांगत.''

''खरंच ?''

''हो,'' ती समजदारासारखी माझ्या कंठमण्यावर हात ठेवून म्हणाली, ''तुझ्या गळ्याची शपथ !''



नंतर मी तिच्या शिदोरीत सामील झालो. वयाप्रमाणे सुभद्रेच्या जेवणापेक्षा माझ्या जेवणाचा वेग जास्त होता. त्याचा फायदा घेऊन मी बकाबका भाकर खाल्ली. सुभद्रेची हळुवार रवंथ संपली. दोघांनीही हात ओलवले.

मी सदऱ्याच्या बाहीने तोंड कोरडवत शाळासोबत्यांच्या घराचा रस्ता धरला. सापडेल त्याच्या घरात शिरून दिवस कलेपर्यंत खेळत बसलो. दिवस कलण्यापूर्वीच माझे लक्ष खेळावरून उडाले. भुकेच्या नावाने पोट कुत्कुत् करत होते. खेळात लक्ष लागत नव्हते. आरोळ्या-जांभया सतत चालू होत्या. मी एकीकडे कलतीकडे झुकणाऱ्या सूर्याच्या गोळ्याकडे बघत होतो व दुसरीकडे केवळ वेळ काढावा म्हणून सोबत्यांशी बोलत होतो; पण अखेर मी खेळ टाकून घराची वाट धरली. घरी आलो, त्या वेळी सुभद्रा उंबऱ्यात डोके ठेवून माझी वाट बघत असलेली दिसली. तिचाही चेहरा उतरलेला अन् डोळ्यांत पाणी तरारत होते. मला पाहताच ती म्हणाली, ''काशा, मला भूक लागली रे !''

''मग, मी काय करू ?''

''कुलूप उघड. आपण दोघं जेवू !''

''माझ्याजवळ किल्ली नाही.''

''मग माझ्या भाकरीतली भाकर का खाल्ली रे, तू ?''

ती एकदम रडकुंडीस आली. नाकातून सूर काढत तालावर बोलल्यासारखी म्हणाली, ''ते काही नाही काशा, मला भूक लागली. मला जेवू दे, नाहीतर मी आईला सांगते. हो—''

असे ती अगदी पहिल्यांदा म्हणाली, तेव्हा मी आईच्या धाकाने घाबरूनच गेलो; पण नंतर आता बिनधोकपणे म्हणालो, ''जा, सांग –''

यावर भुकेपेक्षा मी केलेल्या अपमानाने ती चिडली. भोकाड पसरले. 'मी आईला सांगते, मी आईला सांगते,'' असे टुमणे आळवले

अन् मग झोपी गेली.

ती झोपेच्या स्वाधीन होऊन आपले भुकेचे दुःख विसरून गेली; पण माझ्या जाणत्या शरीराला ते जमले नाही. मला ते सतत टोचत राहिले. आईच्या म्हणण्याप्रमाणे मी ऐकले असतेस, तर बरे झाले असते, असे मला वारंवार वाटू लागले.

तेवढ्यातच आई घरी आली. तिला लांबून बघून मी सुभद्रेला जागे केले. ती उठली आणि घराकडे येणाऱ्या आईच्या वाटेवर गेली; पण आई एकदम घरी आली नाही. पहिल्यांदा तिने सरस्वतीच्या ओसरीत बस्तान ठोकले. माझ्याकडे पाहून न पाहिल्यासारखे भासवले. चुकून दृष्टादृष्ट झालीच, तर आईचे डोळे मोठे होत. ते पाहून माझी छाती धसकली. तरी मनाचा हिय्या करून मी तिच्या दिशेने गेलो. माझी चाहूल घेऊन तिचा चेहरा खूप कडवट झाला. वेळ प्रसंगी माझ्याकडे पाठही केली गेली; पण बोलली काही नाही अन् म्हणून मी तिथे उभा राहू शकलो.

बसल्या बसल्या सरस्वती आणि आई यांच्यामध्ये शेतजमिनीतल्या गप्पांसोबत पानखांडाची देवाण-घेवाणही सुरू झाली. आईने कमरेची पिशवी काढली. कधी चुना, तर कधी तंबाखू खुंटला. काथ खुंटताना आई सरस्वतीला म्हणाली,

"काथ तर नाही ग आता."

तसा मी धूर्तपणा साधून म्हणालो, "मी आणतो."

"काही नाही आणाबिणाचा." असे बोलून आई अतिशय कठोर स्वरात म्हणाली, "आणता येतो मला."

हे ऐकून आम्हा दोघांत पडलेल्या अंतरात टाका मारण्याचा माझा प्रयत्न फुकट गेल्याचे दुःख मला फार जाणवले. तेवढ्यात माझी बाजू घेऊन म्हणा किंवा सहज म्हणा – सरस्वती आईला म्हणाली, "तो आणतो म्हणतो, तर का आणू देत नाही ग, त्याला ?"



यावर आईने अंग हिसडले. नाक मुरडल्यासारखे केले. तेव्हा सरस्वतीने विचारले, "का, झालं तरी काय ?"

"मला त्या मुदबक्याविषयी तू बोलायला नको लावूस, बिचारे !"

नंतर आई स्वतः आमच्या घरात गेली. काथ आणला. दोघींचे पान खाणे झाले. थोड्या वेळात आई घरात आली. आपली कामे करू लागली. ती पाण्याच्या घागरी घेऊन विहिरीवर गेल्याची संधी साधून मी चिमणीत तेल ओतले. आगपेटी घेऊन चिमणी लावायला बसलो. तितक्यात एक डोक्यावर अन् दोन घागरी हातांत घेऊन येत असलेली आई माझ्यावर खेकसली, "ठेव ! ठेव ती चिमणी अन् आगपेटी ! तुला कुणी सांगितल्या या म्हालपंचायती करायला, अं ?"

तरीही आईचे हात रिकामे नसल्याचे पाहून मी माझे काम सुरूच ठेवले. आईने लगेच होत्या जागी घागरी पटकल्या अन् तरातरा चालत माझ्याजवळ आली. माझ्या हातातली चिमणी व आगपेटी हिसकताना म्हणाली, "खबरदार, कधी माझ्या कोणत्याच कामाला हात लावशील तर —"

आणि तिने स्वतःच दिवा लावला.

यानंतर मीही आईच्या कोणत्याही कामात मदत करण्याचे सोडून दिले. ती सारे काही एकटीच करत होती. कोणते हलके-सलके व सुभद्रेला जमण्यासारखे काम असले, तर तिच्याकडून ते करवून घेत होती. तिला सांगितलेल्या कामात माझी लुडबूड तिला खपत नव्हती. असेच आणखी दोनदा माझ्या वाट्याला आल्यावर आता मीही थोडा अकडलोच. खरोखर काहीएक न करता खोलीतल्या एखाद्या वस्तूसारखा एका कोपऱ्यात बसून मुकाट्याने सारे पाहू-न्याहाळू लागलो.

आईची सारी कामे आटोपली म्हणजे आई जेवायला बसत असे. तशी ती आताही बसणार होती. शिंक्यातले सारे काही ताटात वाढून

घेतल्यावर सुभद्रेला जवळ बसवले. वरणा-डाळीचा काला केला. त्याचा एक भला-थोरला घास घेतला. त्या वेळी न राहवून तिचे लक्ष माझ्यावर गेलेच. तशी उठून म्हणाली, ''चल, ऊठ तिथून. माझ्या खायच्या वेळेस असा ताटापाशी खिळून नको बसू !''

हे ऐकून मला पुरते भडभडून आले; पण इलाज नव्हता. पाय आपटत अन् नाक फुरफुरवत मी घरातून ओसरीत आलो. ओसरीत अंधार मावत नव्हता. मी बसलो त्या जागेहून मला सुभद्रा व आई पूर्णपणे दिसत होत्या. मी मात्र त्यांना अजिबात दिसत नव्हतो. दिसू नये असाही माझा हेतू होताच.

आईने चार-सहा घास घेतले. पाणी प्यायली. तोंडचा पेला काढला. लुगड्याचा पदर डोळ्याला लावला. डोळे कोरडवत हलकेच सुभद्रेला म्हणाली, ''पोट्टे, जा, तो बेइमान आहे का पाहा बरं ओसरीत.''

हे ऐकून सुभद्रा तिथे येण्यापूर्वी मी सटकलो. ओसरीतल्या कुणासही सहजासहजी दिसणार नाही, अशा अगदी दाट अंधारात जाऊन उजेडातल्या आईकडे व सुभद्रेकडे पाहू लागलो. सुभद्रा ओसरीत आली. वरवर पाहिल्यासारखे करून घाईने आईच्या ताटाशी बसताना म्हणाली, ''आई, तो तर नाही ग तिथं !''

आईचा चावता घास एकदम थांबला. ती म्हणाली, ''काय, काशा ओसरीत नाही ?''

''नाही.''

''चांगलं पाह्यलं ?''

''हो ना ग...''

तसा आईचा एक हात चिमणीकडे गेला. ती घेऊन तशीच उठली. ओसरीत आली. ओसरीचा कोनाकोपरा धुंडाळत असताना तिचे एकदम माझ्यावर लक्ष गेले-तशी सुरात रखरखीतपणाची ओढाताण करत



मला म्हणाली, ''येनं-येनं बेइमाना, तुझी टेक झाली पुरी; पण माझी नाही होत पुरी कधी. मला तर तुमचे पाय धरावेच लागतात. चल, बसतो की नाही ताटावर हातपाय धून ?''

लेखक - उद्धव ज. शेळके

●●●

मराठी
बालभारती : इ. ६ वी
पहिली माला : १९७१

# १०. आमची शिल्लक

एक दिवस पाऊस पडत होता. दत्तू व हौशी आपापल्या शाळांना गेली होती. टिळक शिकवायला गेले होते. घरी मी एकटीच होते. दाराशीच काही निवडत बसले होते.

तो दाराशी एक मुलगी भीक मागायला आली. तिचा नुसता हाडांचा सापळा राहिला होता. मुलीचे डोके पाटीएवढे, अंगात काही त्राण उरलेला नाही. डोळ्यांत प्राण आलेला आहे. अंगावर एक जीर्ण फाटके असे लज्जारक्षणापुरते हातभर कापड, हातात टिनपाट, अशी येऊन ती दारात पावसात उभी राहिली. तिच्या तोंडावर डाग दिल्याचे ताजे वण दिसत होते. प्रथम मी तिला घरात घेतले व तिची विचारपूस करू लागले.

"तुला भीक मागायला आवडतं का घरात राहायला आवडतं ?"

"भीक मागायला."

"तू माझ्याजवळ राहतेस का ?"

"हो."

"तुला कोणकोण आहे ?"

"कोणी नाहीत. सर्वांनी मला सोडून दिलं आहे. माझं गावही फार लांब आहे."

अशा तऱ्हेने बोलणेचालणे झाल्यावर मी आपल्या मनाशी तिला ठेवून घेण्याचे ठरवले. तिला न्हाऊ घातले व हौशीचे एक लुगडे नेसायला दिले, पण एवढ्यानेच तिचे स्वरूप किती पालटले !

संध्याकाळी मुले व टिळक घरी आल्यावर ही मुलगी पाहून त्यांना कुतूहल वाटले.

"हे काय आहे ?"

"हे दुष्काळाचं चित्र आहे. मी हिला घेतली."

"कशाला ? आपल्याला हौशी आहे, देवानं ही तारा दिली, आणखी ..."

"आणखी ही 'दया' दिली. मला हिची दया आली व देवानंही हिच्यावर दया केली."

"बरं, काही हरकत नाही."

तिचे नाव दया ठेवले.

थोड्याच वेळाने शेजारपाजारच्या कित्येक ख्रिस्ती बाया आमच्याकडे आल्या.

"अहो साहेब, ही मुलगी कोणाची आहे, ठाऊक आहे का ?"

"नाही ! का ?"

"अहो, ही मांगाची आहे ना !"

"मग ?"

"तुम्हांला काही नाही वाटत त्याचं ?"

"काही नाही. का ? आम्हांला मांग, महार, ब्राम्हण वगैरे सगळे सारखेच आहेत."

"तुम्ही आमच्याही पुढे गेलात. आम्हांला नाही चालायचं हे."

असे म्हणून त्या बाया गेल्या व पुढे कित्येक दिवस त्यांनी आमचे घर वर्ज्य केले !

टिळकांनी मात्र यापुढे घरात महार, मांग वगैरे सर्व जातींचे कामगार ठेवण्यास सुरुवात केली.

दया आल्यानंतर दुसऱ्याच दिवशी एक पोक्त वयाची मांगीण टिळकांशी भांडायला आली.

दया भीक मागत मागत ह्या म्हातारीकडे गेली होती. म्हातारीने तिला आसरा दिला. दया भीक मागून आणायची. म्हातारी तिला घरात राहू द्यायची व दोघींचे पोट दयेच्या भिकेवर चालायचे.

"तिला तुमच्या घरी येऊन किती दिवस झाले ?"

"आठ दिवस."

"तेवढ्यावर तिजवर मालकी हक्क स्थापन करतेस काय ? अन् हे डाग कुणी दिले तिच्या गालांवर ?"

"मला ठाऊक नाही."

"खोटं बोलतेस थेरडे ? डाग दोन-तीन दिवसांचे दिसतात. खरं सांग, नाहीतर तुला पाठवतो तुरुंगात खडी फोडायला."

हो ना करता करता ती कबूल झाली, की पोरगी भरपूर भीक आणीना, तेव्हा तिच्या गालाला उलिसंक कोलीत लावलं. मग मात्र टिळक फारच संतापले व म्हातारी पळून गेली. पुन्हा तिने कधी तोंड दाखवले नाही.

दोन्ही मुली शाळेत जाऊ लागल्या. दोघींनाही एकाच वर्गात घातले. हळूहळू त्या मराठी तिसरीत गेल्या. आम्हांला ह्या मुलींकडून काडीचाही त्रास झाला नाही. त्यांनी चोरी, लबाडी वगैरे कधीच काही केले नाही. घरात अगदी घरच्यासारख्या त्या वागत. शेण लावणे, खरकटे हात धुणे वगैरे गोष्टी न सांगता शिकल्या. चटण्या, कोशिंबिरी, पापड, लोणची त्यांना करता येऊ लागली. स्वैपाकातसुद्धा त्या हुशार झाल्या.

पुढे पुढे दुष्काळाचे स्वरूप फारच उग्र भासू लागले. त्यातच मिशनला काही तूट आली, का काही झाले; पण त्यांनी बोर्डिंगमधून काही मुले काढून टाकली. गावात जिकडे तिकडे खळबळ उडाली. मुलांना कुठेच काही आधार नव्हता. सुगंधराव करमरकरांनी टिळकांना ही बातमी येऊन सांगितली. टिळकांना आधी ह्याबद्दल काही माहिती नव्हती. ही बातमी ऐकून टिळकांना फारच वाईट वाटले. ते मजकडे आले व म्हणाले, "अशीच बावीस मुलं मिशननं एकाएकी आपल्या शाळेतून काढून टाकली आहेत. ती अन्नान्न करून मरतील. आता काय करायचं ?"

त्या दिवशी आमच्याजवळ शिल्लक सव्वा रुपया व घरात साठवणीत सव्वाशेर ज्वारी होती; पण आमची मोठ्यांत मोठी शिल्लक म्हणजे देवावरचा विश्वास. ती मात्र अगदी भरपूर होती. आम्ही दोघांनी जमिनीवर आपली मस्तके ठेवून मनोभावे परमेश्वराची प्रार्थना केली. नंतर दोघांनी एकमेकांना वचन दिले, की आपले अन्न व ह्या मुलांचे अन्न ह्यांत काहीच फरक करायचा नाही. जी काय ज्वारी-बाजरीची भाकरी मुलांना मिळेल तीच आपणही खायची !

दत्तूला आम्ही आमच्याजवळ बोलावून घेतला. त्याला सांगितले, "बाळ, पाहा, तुझे भाऊ आज उपाशी रानावनात फिरत आहेत. आम्ही त्यांना आपल्या घरी आणणार आहो. ते जे खातील ते तुला खावं लागेल. खाशील ना ?"

दत्तू म्हणाला, "हो, मी त्यांच्याबरोबरच जेवीन, खाईन. भांडणार नाही."

आणि पुढे मुले आणल्यावर ती जाईपर्यंत ती खात तेच अन्न दत्तूने खाल्ले व आपले वचन पाळले.

लेखक - लक्ष्मीबाई टिळक

●●●

मराठी
बालभारती : इ. ६ वी
पहिली माला : १९७१

# ११. मैत्री

आमच्या विद्यालयातून फी वसुली फार सक्तीने केली जाते. महिन्यातून एक दिवस फी वसुलीसाठी नेमून दिला जातो. त्याच दिवशी सर्वांनी फी देणे आवश्यक असते. एक तर फी भरा, नाही तर नाव कमी करा. जोपर्यंत फी भरली जात नाही, तोपर्यंत रोज दंड भरावा लागतो. काही ठिकाणी हा कायदा अजूनही लागू आहे. फी वेळेवर दिली गेली नाही, तर फी दुप्पट आकारली जाते आणि ती भरण्यासाठी एक तारीख नेमून दिली जाते; पण त्या तारखेलाही फी भरली नाही, तर मात्र नाव कमी करण्यात येते.

आज फी वसुलीची तारीख आहे. शिक्षकांच्या टेबलावर रुपयांच्या राशी पडल्या आहेत. चारी बाजूंना नाण्यांचा खणखण आवाज येतो आहे. ज्या मुलाचे नाव पुकारले जाई, तो विद्यार्थी शिक्षकांसमोर येऊन आपली फी भरून आपल्या जागेवर जाऊन बसे.

मार्चचा महिना होता. याच महिन्यात एप्रिल आणि मेची फी वसुली केली जात होती. परीक्षाशुल्कही आजच घेतले जात होते म्हणून इयत्ता १० वीच्या प्रत्येक मुलाला ४० रु. भरावे लागत होते.

गुरुजींनी २० व्या मुलाचे नाव पुकारले, 'अमरकांत' अमरकांत गैरहजर होता.

गुरुजी - आज अमरकांत आला नाही काय?

एक मुलगा - आला होता. कदाचित बाहेर गेला असेल.

गुरुजी - फी आणली नाही म्हणून?

कोणीही उत्तर दिले नाही.

गुरुजींचा चेहरा खिन्न वाटत होता. ते उसासा टाकीत म्हणाले,



''अरेरे! अमरकांत तर बुद्धिमान मुलांपैकी एक मुलगा आहे. कदाचित फी आणायला गेला असेल. या तासात फी आणली, तर बरं, नाहीतर बिचाऱ्याला दुप्पट फी भरावी लागेल; पण मी काय करू? माझ्या अधिकारात (हातात) काहीही नाही.''

एक मुलगा - मी बाहेर जाऊन त्याला पाहून येऊ काय?

गुरुजी - स्मित करून म्हणाले, तुला घरची आठवण आली वाटतं! ठीक आहे जा; परंतु १० मिनिटांमध्ये परत ये. मुलांना वारंवार बोलावून फी वसूल करायचे माझे काम नाही.

मुलगा - आता येतो मी. आवाराच्या बाहेर मी जाणार नाही. वाटल्यास माझ्याकडून शपथ घ्या.

गोरा रंग, उंच व सडपातळ बांधा असलेला हा मुलगा उत्कृष्ट खेळाडू, रसिक, पण खुशालचेंडू होता. त्याचे नाव होते मोहंमद सलीम.

सलीम व अमरकांत दोघे जवळजवळ बसायचे. सलीमला गणिते सोडवण्यात व भाषांतर करण्यात अमरकांतची खूप मदत होत असे. दोघांत गाढ मैत्री होती. सलीमने बाहेर जाऊन अमरकांतला इकडे तिकडे खूप शोधले; पण कुठेही त्याचा पत्ता नव्हता ! थोडे पुढे जाऊन पाहिले, तर तो एका झाडाआड उभा असलेला दिसला.

सलीम - अमरकांत, फी भरायची आहे की नाही ? गुरुजी फारच संतापले आहेत.

अमरकांत - सदऱ्याने डोळे पुसले व सलीमजवळ येऊन त्याला विचारले, ''माझा नंबर आला काय ?''

सलीमने त्याच्याकडे पाहिले, तर त्याचे डोळे लालभडक दिसत होते. जो आपल्या जीवनात क्वचित रडला असेल, तो सलीम अमरकांतला म्हणाला,

सलीम - तू रडतोस काय ? काय झालं ?

अमरकांत श्यामल रंगाचा, रोडका होता. वैफल्याची छटा त्याच्या चेहऱ्यावर पसरलेली दिसत होती. जणू जगात त्याचे कोणीही नव्हते.

स्मित करत त्याने सलीमला विचारले, ''छे छे कोण रडत आहे ?''

सलीम - तू रडत आहेस. आणखी कोणी रडत नाही. खर सांग, काय अडचण आहे ?

अमरकांतचे डोळे भरून आले. अनेक प्रयत्न करूनही तो आपले अश्रू गिळू शकला नाही, तेव्हा सलीमला वस्तुस्थिती समजली. तो त्याचा हात धरून सहानुभूतीने म्हणाला, ''फी आणली नाही ना ? मला आधीच का सांगितलं नाहीस ? म्हणजे तू फार वाईट आहेस. अशा माणसाला गोळी घालून ठार मारले पाहिजे. आपल्या मित्रांपासून लपवतोस ? चल वर्गात, क्षुल्लक गोष्टीसाठी इतका वेळ रडत बसलास ?''

मित्राचे हे प्रेमाचे बोल ऐकून त्याला समाधान वाटले. धीर आला ; परंतु उपकाराच्या जाणिवेने त्याची मान खाली झाली.

अमरकांत - (संकोच करत म्हणाला) काय गुरुजी आजचा दिवस थांबणार नाहीत ?

सलीम - कठोरतेने म्हणाला, ''हो, तुझ्यासाठी शाळेच्या नियमात बदल केला जाईल काय ? खरंच ! तू फार वाईट आहेस. हे तर बरं झालं, की मी घरूनच जास्त पैसे घेऊन आलो आहे. नाहीतर तू चांगलीच परीक्षा दिली असतीस. चल आता शाळेला जाऊ.''

दोघे मित्र शाळेच्या दिशेने जाऊ लागले.

अमरकांत - गुरुजी फार रागावतील नाही का ?



सलीम - पण फी तर घेतील आणि जर गुरुजींनी तुला विचारले, की इतका वेळ कुठं होतास ? तर त्यांना सांग की, ''मी फी आणायला विसरलो होतो.''

अमरकांत - माझ्याच्याने खोटे बोलले जाणार नाही. मीतर सर्व खरं खरं सांगेन.

सलीम - तर मग तू माझा मार खाशील.

शाळा सुटली. दोघे मित्र घरी जाण्यास निघाले.

अमरकांत - सलीम, तू माझ्यावर फार उपकार केले आहेस.

सलीम - (त्याच्या तोंडावर हात ठेवून) खबरदार ! बस. आता तोंडातून एकही शब्द बाहेर काढलास तर.

मैत्रीमध्ये उपकाराचा उल्लेख कशाला ?

लेखक : प्रेमचंद

मराठी अनुवाद : श्रीम. सईदा आय. इनामदार

●●●

उर्दू
बालभारती : इ. ६ वी
दुसरी माला : १९८५

# १२. सत्व्यवहाराचा महिमा

कथा आहे बगदाद शहराची. तेथे इब्नेसाबात नावाचा एक मोठा व कुप्रसिद्ध चोर राहात होता. अगदी लहानपणापासून त्याचे सारे आयुष्य चोरी करण्यातच व्यतीत होत होते. चोरीच्या अपराधात त्याला अनेक वेळा अनेक प्रकारच्या शिक्षाही झाल्या होत्या व तुरुंगवासही भोगावा लागला होता. इतकेच नव्हे, तर एका चोरीच्या अपराधात त्याचा एक हात कापून टाकण्यात आलेला होता.

नेहमीप्रमाणे एका मध्यरात्री त्याने चोरी करण्यासाठी एका शहरातील प्रमुख वस्तीत प्रवेश केला. त्याला एक सुंदर, टुमदार घर दिसले. त्या घराभोवती चारही बाजूंनी उंच भिंतींनी घेरलेला आवार होता. त्या आवारात अनेक प्रकारची हिरवीगार झाडेही बहरलेली होती. त्याने अंदाज बांधला, की ते एखाद्या श्रीमंतांची हवेली असावी किंवा एखाद्या धनाढ्य व्यापाऱ्याचे गोदाम असावे. जास्त विचार करायला वेळ कोठे होता ? मुख्य इमारतीच्या दाराजवळ जाऊन तो थोडा थबकला, त्याने अंदाज घेतला व दाराला हळूच धक्का दिला. आतून दार उघडेच होते. इब्नेसाबात सहज आत शिरला.

आतल्या दालनात त्याला एकीकडे खजुराच्या पानांची जुनी चटई व चामड्याची एक उशी दिसली. दुसरीकडे एका कोपऱ्यात लोकरी कापडाच्या तागांचे ढिगारे पडलेले होते. अर्थात इब्नेसाबातने निष्कर्ष काढला, की ते व्यापाऱ्याचे घर आहे; पण त्या जाड्या-भरड्या लोकरी कपड्यांच्या मोठ्या ढिगाऱ्यांकडे तिरस्काराने पाहत तो पुटपुटला, "या अभागी व्यापाऱ्याला व्यापारासाठी इतर वस्तू भेटली नाही का ? ही सगळी लोकर चोरून नेली, तरी त्याचे किती पैसे मिळणार ? पण रिकाम्या हाती परत जाणे योग्य नाही; म्हणून लोकरी कपड्यांचे गाठोडे बांधण्यास सुरुवात केली ; पण मुख्य अडचण ही होती, की फक्त



आपल्या एका हाताने त्या लोकरी कपड्यांचे गाठोडे बांधणे त्याला फारच अवघड होत होते. त्याने आपल्या छोट्या हाताने गाठोड्याचे टोक दाबून आपल्या दातांच्या मदतीने गाठ बांधण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला ; पण काही केल्या गाठ बांधली जात नव्हती. तो घामाघूम झाला व थकल्यामुळे त्याला धाप लागली. इतक्यात त्याला कोणाच्यातरी पायांची चाहूल ऐकू आली. त्याला भासही झाला, की कोणीतरी दाराआड उभा आहे. इतक्यात एक माणूस अत्यंत शांतपणे त्याच्या समोर येऊन उभा राहिला. त्याच्या हातात एक प्रज्वलित मशाल होती व त्याच्या प्रकाशात दालनाचा परिसर उजळून निघाला होता. त्या माणसाच्या अंगावर बदामी रंगाचा अंगरखा होता व चेहऱ्यावर मृदू हास्य पसरलेले होते. त्याच्या लोभस तेजस्वी चेहऱ्याकडे इब्नेसाबात एक क्षण पाहतच राहिला. आता त्याच्या मनातील भीती दूर झालेली होती व त्याला हायसे वाटत होते. इतक्यात त्या अनोळखी माणसाचा भारदार आवाज त्याच्या कानी पडला. मित्रा, तुझे कल्याण असो ! पुरेसा प्रकाश व दुसऱ्या एखाद्याच्या मदतीशिवाय तुझे काम पूर्ण होणे शक्य नाही. हातातली मशाल एका बाजूला व्यवस्थित ठेवून तो पुन्हा उद्गारला, "मी तुझ्या मदतीसाठी हजर आहे ; पण तू चांगलाच थकून गेलेला दिसतोस. म्हणून थोडी विश्रांती घे. तोपर्यंत मी तुझे काम उरकतो", असे सांगत त्या अनोळखी माणसाने त्या लोकरी कपड्यांचे एक लहान व एक मोठे असे दोन गाठोडे व्यवस्थित बांधून तयार केले. स्वतःचा अंगरखाही काढून त्याने एका गाठोड्यात बांधला व तो म्हणाला, "मित्रा ! तुला भूकही लागलेली दिसते. तेव्हा येथून निघण्यापूर्वी थोडेसे दूध घे. म्हणजे तुझा थकवा दूर होईल. असे बोलून तो अनोळखी माणूस लगबगीने आतल्या बाजूस निघून गेला. हे जे काही घडत होते, ते सर्व अनपेक्षितच होते. इब्नेसाबात मनातल्या मनात विचार करू लागला, 'हा माणूस कोण असेल बरे !' हा

घरमालक तर नक्कीच नाही. किंबहुना हा माझ्यासारखाच चोर असावा व योगायोगानेच आम्ही दोघे एकाच घरात चोरीसाठी आलेलो आहोत. इतक्यात पुन्हा दालनाचे दार उघडले गेले व ती व्यक्ती दुधाने काठोकाठ भरलेला पेला घेऊन हजर झाली. इब्नेसाबातला खूप भूक लागलेली होती. त्याने गटागटा ते दूध पिऊन पेला रिकामा केला. नंतर तो म्हणाला, ''तुझी मला जास्त ओळख नसली, तरी तू एक चांगला साथीदार सिद्ध होऊ शकतो, असा मला विश्वास वाटतो. तेव्हा इच्छा असेल, तर तुझ्याशी भागीदारीत चोरीचा व्यवहार करण्यास मी तयार आहे. मात्र आजच्या चोरीच्या मालामध्ये तुला बरोबरीचा वाटा मिळणार नाही.'' त्या अनोळखी माणसाने सहज एक नजर टाकली व आपल्या अर्थपूर्ण स्निग्ध हास्यानेच जणू त्याच्या प्रस्तावाला उत्तर देत त्याने लहान गाठोडे उचलून इब्नेसाबातच्या डोक्यावर ठेवले व मोठे गाठोडे स्वत:च्या डोक्यावर घेऊन इब्नेसाबातच्या मागे चालू लागला; पण त्याचे गाठोडे हे भले वजनदार असल्यामुळे तो अडखळत हळूहळू चालत होता. पुढे एक उंच पूल आला व चढ खूपच मोठा असल्यामुळे डोक्यावरील ओझे सांभाळणे त्याला अवघड झाले. त्याचा तोल गेला व तो खाली कोसळला. इब्नेसाबातला घाई झालेली असल्यामुळे हे पाहून तो ओरडला, ''काय रे ! इतके ओझे तुला झेपणार नव्हते, तर तू उगाच घेऊन कशाला आलास ?'' काही एक शब्दानेही उत्तर न देता धापा टाकीतच तो गडबडून उठला. त्याने गाठोडे सावरले व पुन्हा इब्नेसाबातच्या मागे चालू लागला. थोड्याच वेळात दोघे एका निर्जन स्थळी पोहोचले. सुटकेचा नि:श्वास टाकत इब्नेसाबातने हुकूम सोडला, ''डोक्यावरील गाठोडे खाली ठेव आणि चालता हो, तुझे काम संपलेले आहे.'' धापा टाकीतच त्या अनोळखी माणसाने डोक्यावरचे गाठोडे अलगद जमिनीवर ठेवले. चेहऱ्यावरचा घाम पुसत हसऱ्या चेहऱ्याने त्याने इब्नेसाबातला सांगितले, ''माझ्या प्रिय मित्रा ! आता मी तुझी



रजा घेतो. तुला मदत करण्याच्या कामी माझ्याकडून जी कसूर झाली, त्याबद्दल मला क्षमा कर; पण हे स्पष्ट करणे अत्यंत जरूरीचे आहे, की तू मला जो समजलास, तो मी नाही. ज्या घरात तुझी माझी गाठ झाली ते माझेच घर आहे. तू माझा पाहुणा होतास. मी तुझी चांगली सेवा करू शकलो नाही, याची मला खंत आहे. आता तुला माझे घर माहीत झालेले आहे. यापुढेही काही मदत हवी असल्यास तू मला नि:संकोच भेटू शकतोस.''

असे आश्वासन देऊन इब्नेसाबातशी हस्तांदोलन करून तो अनोळखी माणूस तेथून झपाट्याने निघून गेला. इब्नेसाबात त्याला जाताना पाहतच राहिला. त्याला काहीच सुचेना, तो हतबद्ध झाला.

आता सूर्य चांगलाच वर आलेला होता. चोहिकडे प्रकाश पसरून गेला होता; पण इब्नेसाबातला आता पकडले जाण्याची मुळीच भीती वाटत नव्हती. मागच्या रात्रीच्या प्रसंगाने त्याचे मन हेलावून गेलेले होते. तो सतत विचार करत होता, की हा माणूस कोणी चोर नव्हता, तर स्वत: घरमालक होता. मला पकडून देऊन शिक्षा देण्यापेक्षा त्याने आदराने व आनंदाने माझा पाहुणचार केला. खरंच ! अशीही माणसं या भूतलावर राहतात !

थोड्या वेळानंतर तो भानावर आला. त्याच्या गुदमरलेल्या मनाची कोंडी फुटली. एका नवीन विचाराने प्रेरित होऊन तो पुन्हा सकाळी शहरात परतला व रात्री ज्या घरात चोरी करण्यासाठी आला होता, त्या घरासमोर जाऊन उभा राहिला; पण रात्रीच्या अंधारात नि:संकोच त्या घरात प्रवेश करणाऱ्या इब्नेसाबातचे आता दिवसाच्या प्रकाशात त्या आवारात प्रवेश करण्याचे धाडस होत नव्हते. त्या घराच्या समोरच्या बाजूस एक झोपडी होती व त्याच्या दाराजवळ एक लाकूडतोड्या शांत बसलेला होता. इब्नेसाबातने त्याला विचारले, ''या समोरच्या घरात

राहणाऱ्या श्रीमंत व्यापाऱ्याचे नाव काय आहे ?'' लाकूडतोड्या आश्चर्याने त्याच्याकडे पाहत उत्तरला, ''कोण श्रीमंत व्यापारी? तुम्ही या शहरात नवीनच आलेले दिसता. या समोरच्या घरात तर बगदादचे प्रसिद्ध सूफी संत हजरत जुनेद बगदादी राहतात.''

इब्नेसाबातला आश्चर्याचा आणखी एक धक्का बसला. आदराने ओथंबून आलेल्या मनाने नि:संकोचपणे तो त्या घरात शिरला. त्याच मोठ्या दालनात एका चटईवर त्याचे रात्रीचे साथीदार डोळे मिटून ईश्वराचे नामस्मरण करीत शांत बसलेले होते. इब्नेसाबात लगेच पुढे सरसावला व त्याने आदराने आपले डोके त्यांच्या पायावर ठेवले. त्याच्या डोळ्यांतील पश्चात्तापाचे अश्रू हजरत जुनेद बगदादी यांच्या पायाचा अभिषेक करत होते.

सूफी संत जुनेद बगदादी यांनी इब्नेसाबातचे डोके वर उचलले व प्रेमाने भारावून त्याला आपल्या हृदयाशी घट्ट आवळून धरले. इब्नेसाबातच्या तोंडाने एकही शब्द फुटत नव्हता. त्याचे मन नवप्रकाशाच्या आनंदाने फुलून गेलेले होते. अशाप्रकारे हजरत जुनेद यांच्या सत्व्यवहारामुळे एका अट्टल गुन्हेगाराला जीवनाची पवित्र दिशा मिळाली.

लेखक : मकतबा इस्लामी

मराठी अनुवाद : प्रा. डॉ. अंबेकर अब्दुल अजीज

●●●

उर्दू
बालभारती : इ. ५ वी
चौथी माला : १९९९



# १३. मित्र असावा तर असा

गिरधारीलालांच्या दुकानावर ग्राहकांची एकच गर्दी उडालेली होती. लग्नसराईचे दिवस होते. ग्राहकांची रीघ लागली होती. त्यांना त्यातून डोके वर काढायची उसंत नव्हती, तरी त्यांची दृष्टी रस्त्याच्या पलीकडे वारंवार जात होती. त्यांच्या दुकानासमोर एक मोठे दुकान होते. दुकानावर ''इम्तियाज क्लॉथ स्टोअर्स'' अशी मोठी सुंदर पाटी लागलेली होती; पण आज ते दुकान बंद होते.

गिरधारीलाल सतत विचार करून अस्वस्थ झाले होते, की आजही ते दुकान का बंद आहे ? गेल्या दहा दिवसात ते का उघडले नाही ? लग्नसराईच्या दिवसात दुकान बंद ठेवण्याचे कारण काय असणार ? इम्तियाजसाहेब कुठे बाहेर गावी तर गेले नसावेत किंवा आजारी तर पडले नसावेत ? देव जाणो, कदाचित कोणता अपघात तर झाला नाही ना ? इम्तियाजांच्या घरी जाऊन माहिती काढायला हवी होती; पण सवड नसल्यामुळे ते जाऊ शकले नव्हते. त्यांना आपल्या हलगर्जीपणाची लाज वाटली. त्यांनी विचार केला, की आज काहीही झाले, तरी त्यांच्या घरी जायचेच, जवळच आहे. सुपुत्री रेखाच्या लग्नाचे निमंत्रणपण द्यायचे आहेच.

संध्याकाळी गिरधारीलालांनी वेळेच्या अगोदरच दुकान बंद केले. झपाझप ते इम्तियाजांच्या घरी पोहोचले आणि त्यांना हाक मारली. दहा अकरा वर्षांचा एक मुलगा बाहेर आला. गिरधारीलालांना बघून तो खूप आनंदित झाला.

''गिरधारी काका ! या, आत या, बाबा घरीच आहेत.''

''बेटा अमजद, सगळं काही कुशल आहे ना?''

''होय काका ! अगदी कुशल आहे.''

त्यांनी समाधानाचा विश्वास सोडला आणि पडदा हटवून खोलीत प्रवेश केला.

इम्तियाज अहमद आपल्या मुलाबाळांबरोबर हास्यविनोद करीत ऐसपैस बसले होते. गिरधारीलालांना बघून ते त्वरित सरळ होऊन बसले.

"गिरधारी ! अरे या बंधू. येथे निवांतपणे बसा."

इम्तियाजच्या जवळ बसल्यानंतर ते गंभीर स्वरात म्हणाले, "बंधू ! तुमची प्रकृती बरी आहे ना ?"

"होय, एकदम मजेत, तुम्ही स्वतःच पाहा ना."

"तुम्ही कोठे परगावी गेला होता ?"

"नाही, कुठेच नाही."

"मग दहा दिवसांपासून दुकान का बंद ठेवले आहे ?"

इम्तियाजांनी टाळाटाळ करण्याचा प्रयत्न केला.

"विशेष काही नाही. विचार केला, काही दिवस सुट्टी घेऊ या."

त्यांच्या उत्तराने गिरधारींचे समाधान झाले नाही. ते म्हणाले, "इम्तियाज भाई ! मी तुम्हांला बऱ्याच वर्षांपासून ओळखतो. आठवड्यातील सुट्टीशिवाय तुम्ही कधीच दुकान बंद ठेवले नाही. आता लग्नसराईच्या दिवसात दुकान बंद ठेवण्याचे काही ना काही कारण जरूर असेलच."

"मित्रा ! बोलतोय ना, काहीच कारण नाही."

"तुम्ही काहीतरी माझ्यापासून लपवीत आहात. कदाचित हा मित्र आता विश्वासपात्र राहिला नसेल."

गिरधारींना खिन्न पाहून इम्तियाज अहमदसुद्धा गंभीर झाले. "नाराज का होता ? तुम्ही आग्रह करत आहात, म्हणून नाईलाजाने मी सांगतो,



"मला माहीत आहे, रेखा बेटीचा लग्नसोहळा जवळ आहे. गेल्या चार-पाच महिन्यापासून व्यापार विस्कळीत झाला आहे. लग्नासाठी तुम्हांला पुष्कळ रुपयांची गरज भासेल. आसपास कापडाची हीच दोन दुकाने आहेत. मला वाटले, दहा-बारा दिवस दुकान बंद ठेवीन, तर तुमचा धंदा तेजीत चालेल आणि तुमची चिंता नाहीशी होईल."

यावर गिरधारीलाल हळू आवाजात म्हणाले, "मला रुपयांची गरज असती, तर तुमच्याकडून उसने घेतले असते."

इम्तियाज अहमदना हसू आले. ते म्हणाले, "आता तुम्ही माझी चेष्टा करीत आहात. तुम्ही किती स्वाभिमानी आहात, याची मला जाणीव आहे. कितीही निकड असली, तरी तुम्ही कुणापुढे हात पसरणार नाहीत.

गिरधारीलालांनी मान खाली घातली. गप्प बसून ते काहीतरी विचार करीत राहिले, मग डोके वर करून म्हणाले, "मी तुम्हांला निमंत्रण देण्यास आलो आहे. रविवारी सकाळी येऊन आपल्या बेटीचा लग्नसोहळा पार पाडा."

"अवश्य गिरधारी ! बेटीचा विवाह आणि मी नाही येणार ? तुमची वहिनी आणि मुलेही या लग्न समारंभात सहभागी होण्यास आतूर आहेत."

इम्तियाज अहमद आपल्या मित्राबरोबर बाहेर आले. त्यांनी जेव्हा निरोप घेतला, तेव्हा त्यांच्या डोळ्यांत अश्रू होते - उपकाराचे नि कृतज्ञतेचे अश्रू !

लेखक : मुहम्मद हसन फारूकी

मराठी अनुवाद : मुश्ताक बोलिंजकर

●●●

उर्दू
बालभारती : इ. ५ वी
चौथी माला : १९९९

# १४. देणाऱ्याचे हात हजार

पूज्य मदनमोहन मालवीयांची आता आठवण होतेय. त्यांच्यावर ईश्वराची नेहमीच कृपा होती. एकदा ते म्हणाले होते, ''देशाच्या प्रत्येक दरवाजावर प्रत्येक ठिकाणी आपली भरली ओंजळ घेऊन एखादा दाता उभाच असतो; पण कमतरता आहे ते दान स्वीकारणाऱ्याची. ते ज्याच्या हाती पडेल तो नशीबवान.'' मी त्यांच्या जवळून उठून जाऊ लागलो, तर ते म्हणाले, ''माझे हे शब्द लक्षात ठेव''.

एकदा असाच मुंबई मेलमधील तिसऱ्या वर्गाच्या डब्यातून मी प्रवास करत होतो. त्या वेळी पूजनीय मालवीयजींच्या वचनाचे माहात्म्य मला तीव्रतेने जाणवले.

मेलचा प्रत्येक डबा जवळजवळ खच्चून भरला होता. फक्त एकच डबा रिकामा होता; पण त्यामध्ये चढणे म्हणजे तारेवरची कसरतच होती. स्टेशन येताच डब्याच्या खिडकीतून एक रुबाबदार पेशावरी पठाणाचा चेहरा बाहेर दिसला. खिडकीच्या बाहेर आम्ही सात प्रवासी होतो. खान आणि फौजी हे त्या काळातील साहसी, क्रूर समजले जात. त्यांना डावलून पुढे जाणे कठीण नव्हे, अशक्यच होते.

खान आम्हा प्रवाशांकडे एक दृष्टी टाकत रुबाबात व दरडावून म्हणाले, ''खिडकी उघडली जाणार नाही.''

आम्ही समजून चुकलो, की ठीक आहे. हा काही खिडकी उघडणार नाही. त्याच्या आवाजानेच आमच्या सात जणांपैकी पाच जणांनी दुसऱ्या डब्याकडे धाव घेतली. सहाव्यानी मात्र समोरून येणाऱ्या चेकरकडे तक्रार केली, ''हे महाशय, सगळा डबाच अडवून बसलेत आणि आम्हांला चढूसुद्धा देत नाहीत.'' चेकर महाशयांनी आपल्या रुबाबदार व मोठ्या आवाजात खानला म्हटले, ''तुम्ही दुसऱ्या प्रवाशांना डब्यात चढण्यासाठी अडवू शकत नाही, खिडकी उघडा.'' खानने हसून खिडकी उघडली आणि चेकरकडे उपहासाने बघून म्हणाला,



''ओह, तुम्ही याला बसवणार, बसवा-बसवा; पण गाडी चालू झाली, की मी याला बाहेर फेकून देईन, तेव्हा झेंडा दाखव म्हणजे झालं.''

चेकर तर निघूनच गेला; पण तो प्रवासीही पळून गेला. खान त्यांना म्हणाला, ''ए, कुठे चाललास? ये इकडे ये. पूर्ण शीट तुला देतो.'' खानचे निमंत्रण स्वीकारण्याची ताकद त्या महाशयात नव्हती. तो निघून गेला. मागे पळूनही पाहिले नाही. खानने आपली खिडकी जोरात बंद करून घेतली.

मी आपली बॅग हातात घेऊन अजूनही आपल्या जागेवरच उभा होतो. खानने माझ्याकडे बघितले, मी खानकडे! त्यांनी काय विचार केला हे मला माहीत नाही; पण मी विचार केला, 'मालवीय महाराजांच्या वचनाप्रमाणेच प्रत्येक दारात एक दाता उभा असतो. त्यानुसार हा खान त्यांपैकीच आहे की काय ?' त्याने मला विचारले, ''तू नाही गेलास ?''

मी पटकन सांगितले, ''नाही खानसाहेब.''

''का ? गाडीत चढणार नाही ?''

''चढीन; पण तुम्ही प्रेमाने आत घेतले तर.''

''का ? दुसऱ्या डब्यात जाणार नाही ?''

''खानसाहेब, तुम्ही बहादूर पठाण आहात. बहादूर माणसांचं हृदय खूप मोठं असतं. त्यात जागा मिळाली नाही, तर कोठे जागा मिळणार ?''

''मी तुला खाली फेकून देईन अशी भीती तुला वाटत नाही ?''

''नाही खानसाहेब, बहादूर माणसांचे हात मजबूत आणि हृदय कोमल असतं. तुम्ही मला खाली फेकूच शकत नाही.''

खानने काही विचार केला, तेवढ्यातच गाडीची शिटी वाजली. गाडी सुरू झाली. खानने खिडकी उघडली व मला बोलावलं. मी खिडकीजवळ पोहोचलो. खानने हात देऊन मला गाडीत घेतलं.

अठरा माणसं बसू शकतील एवढ्या छोट्या डब्यात खान, त्यांची सुंदर पत्नी आणि दोन मुलं आरामात झोपली होती. मी खानच्या बायकोला नमस्कार केला आणि खानला धन्यवाद देऊन दुसरीकडे बसलो. थोड्या वेळाने खानने मला प्रेमाने दोन सफरचंद दिले. ते खाऊन खूप मजा आली. मी मनात विचार केला, 'मालवीयजी महाराजांचे वचन सत्य आहे. देशाच्या प्रत्येक दारात एक दाता उभा आहे आपली ओंजळ घेऊन; परंतु कमतरता भेट स्वीकारणाऱ्या हातांचीच आहे.'

खरोखरंच हा खान 'ज्याला आम्ही सात प्रवाशांनी यमदूत किंवा जिवंत भूत समजलो होतो, तो एक दाता होता आणि त्यांची प्रेमाची भेट माझ्या हातात होती.'

पुढच्या स्टेशनवर गाडी थांबली. योगायोगाची गोष्ट प्लॅटफॉर्म माझ्या बाजूने होता. मी खिडकीच्या बाहेर वाकलो. बाहेर तीन प्रवासी होते. दोन तरुण, एक म्हातारा. खानकडे न बघताच मी त्या म्हाताऱ्याला आवाज दिला, "अहो महाशय हा खानसाहेबाचा डबा आहे. त्यांनी माझ्यावर उदार होऊन मला डब्यात बसण्यासाठी जागा दिलेली आहे. ही जागा तुम्हांला देऊन मी उभा राहीन. तुम्ही आत या आणि नंतर एका क्षणाचाही विलंब न करता त्या दोघा तरुणांना सांगून टाकले की, तुमच्यासाठी खिडकी उघडणार नाही. तुम्ही दुसरीकडे जा."

वयस्क माणसाला मी माझ्याजवळ बसवले. मी थोडावेळ खिडकीच्या बाजूने वाकलो आणि नंतर तिथेच खिडकीला लागून वाचत उभा राहिलो. दहा-वीस मिनिटांनी खानने मला विचारले, "तू का उभा आहेस ?"

मी सरळ शब्दात म्हणालो, "खानसाहेब, तुम्ही माझ्यावर उदार होऊन जी जागा मला बसण्यासाठी दिली होती, ती मी या वयस्क माणसाला दिली आहे; पण मला काही त्रास नाही. तुम्ही आरामात



झोपा." खानने न रागावता शांतपणे मला बसण्यासाठी जागा दिली. खानला धन्यवाद देऊन मी बसलो.

पुढच्या स्टेशनला गाडी थांबल्यानंतर मी एका स्त्रीला आणि मुलाला माझ्या जागेवर बसवले. मी उभा राहिलो. काही वेळानंतर खानच्या बायकोने खानच्या कानात काहीतरी सांगितले आणि खानने मला परत बसण्यास जागा करून दिली.

आता दुपार झाली होती. खान आळस देत देत मला म्हणाला, "तुला ज्याला बसवायचे आहे त्याला तू बसवू शकतोस; पण तूही बस, मी झोपतो."

खान ज्या वेळेस झोपून उठला, तेव्हा आम्ही बाराजण होतो. खानने मला पाहिले व हसून बोलत म्हटले, "सरकारने जर तुला मुंबई मेलमध्ये कामास ठेवले, तर प्रवाशांना आराम मिळेल." त्यावर मी म्हणालो, "पण खानसाहेब तुम्हांला पण माझ्याबरोबर राहावं लागेल; कारण तुम्ही जर नसाल, तर रिकामा डबा मला कसा मिळेल ?" खान आणि त्यांची बायको इतक्या जोरात हसले, की मला खूप मजा वाटली.

संध्याकाळी ७ वाजता माझे स्टेशन आले. मी खाली उतरू लागलो; तर खानने माझा हात हातात घेऊन प्रेमाने दाबला. मी त्यांच्या पत्नीस सलाम करण्यासाठी हात वर करणार एवढ्यात तिनेच दोन्ही हात जोडून मला सलाम केला.

लेखक : कन्हैयालाल मिश्र प्रभाकर

मराठी अनुवाद : सौ. संध्या उपासनी

●●●

हिन्दी
बालभारती : इ. ६ वी
पहिली माला : १९७१

# १५. मालक, मला अवदसा आठवली !

ती एक स्वच्छ आणि प्रसन्न सकाळ होती. सतत पाच दिवसांच्या झडीनंतर त्या दिवशी मंद सुगंधित कडक ऊन पडले होते. मन उल्हसित झाले होते. मी समोरच्या खोलीत बसून विचार करत होतो. कालिदासाने पावसाळी दिवसांना 'दुर्दिन' म्हटले आहे ते योग्यच आहे. दररोज ढग भरून येणे, त्यांचा होणारा गडगडाट आणि त्यांचे विरणे हे त्यालासुद्धा आवडले नसेल. मी अशा विचारात मग्न असतानाच समोरच्या सडकेने एक तरुण येत असलेला दिसला.

" सायब, नौकरी मिळेल का ?" या आवाजाने मी एकदम दचकलो. पाहतो तो समोर एक मध्यम वयाचा, उंचापुरा गृहस्थ हात जोडून उभा होता. अंगात एक मळकट सदरा होता, जो खांद्यावर आणि बगलेत फाटून आपल्या जीर्णपणाची साक्ष देत होता. उघडे बोडके आणि पायाला पडलेल्या भेगा ! आशा-निराशा जणू त्याच्या डोळ्यांत लपंडाव खेळत होत्या. परत त्याने विचारले, "मालक, नौकरी मिळंल का ?"

"तू कोणते काम करू शकतोस ? स्वयंपाक करशील का ?" मी विचारले.

"होय सायब ! मी सगळं कायी काम करीन."

मलाही अशाच एका आचाऱ्याची गरज होती. अधिक विचारपूस न करता मी त्याला कामावर ठेवले.

दोन वेळचे जेवण करणे, झाडणे इत्यादी सगळी कामे तो करत असे. मुलांना खाऊ घालण्यात नि त्यांच्याशी खेळण्यात त्याला अधिक आनंद वाटत असे. आमच्या लहान मुलीवर — प्रमोदिनीवर तो खूप माया करत असे. तिच्यासाठी तो काहीही करायला तयार असे. तो म्हणायचा, "चार वरसं झाली, आमची रमैयासुद्धा मोठ्ठी



झाली असंल." त्याच्या या भाबडेपणावर मी बेहद्द खुश होतो.

एके दिवशी मी विचारले, "शंकर, मग तू कधी जाणार तुझ्या रमैयाकडे ? घरी कधी पत्र पाठवतोस की नाही ? रमैयाची आईपण असेल ना ?"

"सगळी हायतं मालक ! दोन-चार आंब्याची झाडं हायती. थुडी जमीन हाय. भाऊ-भावजय हाय. रमैयाची माय तिच्या माहेरला ऱ्हाती. तिलाच मी मनिआर्डर धाडतो."

रिकाम्या वेळी तो आमच्यात येऊन आपली रामकहानी सांगत बसायचा.

शेवटी म्हणायचा, "मालक, आता मी दुसरीकडं नौकरी करणार न्हाई, तुमचं दार सोडणार न्हाई." पण शेवटी तो गेलाच.

कुंद आणि आळसावलेला दिवस होता तो. पावसाच्या जोरदार माऱ्याने धरणीमाता न्हाऊन निघत होती. मी पाहिले तो शंकर धोतराने तोंड झाकून, आपले गाठोडे बगलेत धरून माझ्या टेबलाकडे येत होता. आल्या आल्या त्याने माझ्या पायावर लोळण घेतली आणि हुंदके देऊन तो रडू लागला.

"काय झाले रे शंकर ?" मी विचारले. त्याचे रडणे आणखी वाढले, "माप करा सरकार, आता मी गावाकडं जाणार हाय."

मी हवालदिल झालो. "अरे, सांग ना ! काय झाले तुला ?"

त्याने माझ्या हातात एक रुपयाची नोट ठेवून घोगऱ्या आवाजात म्हटले, "मालक मला दुरबुद्धी झाली. मी आपल्या घरात राहण्यास लायक नाही. माफ करा सरकार."

त्याच्या डोळ्यांतून सतत अश्रुधारा वाहत होत्या. 'तुझ्या एक रुपयाच्या चोरीची चर्चा आम्ही कोणाजवळही करणार नाही. पश्चातापाने माणसाची पापे धुऊन जातात.' हे मी त्याला परोपरीने समजावून सांगितले; पण त्याने ऐकले नाही.

''सरकार, माजं तोंड तर काळं झालं ना ! आता मी हे तोंड आपल्या सगळ्यांना कसं दाखवू ? काय सांगू मालक, मला अवदसा आठवली !''

आणि असे म्हणत पडत्या पावसातच तो आवाराच्या बाहेर पडला.

अनेक वर्षं निघून गेली; पण आजही तो माझ्या डोळ्यांपुढे दिसतो आहे आणि त्याचे शब्द निनादत आहेत - 'मालक, मला अवदसा आठवली !'

लेखक : विनय मोहन शर्मा

मराठी अनुवाद : ज्ञानकुमार आर्य

●●●

हिन्दी
बालभारती : इ. ५ वी
चौथी माला : १९९९



# १६. पप्पू आणि चिमणीचं घरटं

शाळेतून आनंदाने निघालेला पप्पू घरात शिरताच उदास झाला.

पप्पूच्या घरातील स्वयंपाकखोलीच्या फळीवर एक चिमणी व एक चिमणा घरटं बांधत होते. बऱ्याच दिवसापासून आपल्या चोचीतून काड्या, गवत, धागे वगैरे आणणे चालले होते. बस, आता एक-दोन दिवसातच चिमणी अंडी घालणार, मग थोड्याच दिवसांत त्यातून लहान लहान पिलं निघतील...! पिलांच्या कल्पनेनेच पप्पूला आनंद व्हायचा. आपण पिलांना भरवू, खेळवू, छानपैकी अंथरूण बनवून त्यावर त्यांना झोपवू ! अशा सर्व योजना तो करीत असे.

आजसुद्धा शाळेतून येऊन, पप्पूने त्याचे दप्तर त्याच्या जागेवर ठेवले व धावत स्वयंपाकघराच्या फळीजवळ आला. वर पाहिले तर फळीवर घरटे नाही ! त्याला धक्काच बसला. घरटे कुठे गेले ? पक्की खात्री करून घ्यायला तो खिडकीच्या गजावर चढून बघितलं. घरटं खरंच नव्हतं. घाबरलेला पप्पू घरटे शोधू लागला. इतक्यात त्याची मम्मी आली, ''काय शोधतो आहेस पप्पू ? .... कधी रे आलास शाळेतून ? काय खाल्लं, की नाही ?''

मम्मीच्या सर्व प्रश्नांकडे दुर्लक्ष करून तो लगेच म्हणाला, ''मम्मी ... मम्मी ... माझ्या चिमणीचं घरटं त्याच्या जागेवर नाही ... ! कुठं गेलं ... ?''

''कुठचं घरटं ? ... ह्या फळीवर चिमणी बांधत होती, त्या घरट्याबद्दल तू बोलतोस ?''

''हो, मम्मी ... तेच घरटं ... तेच ... कुठे गेलं ते ... ?''

''ते तर मी काढून टाकलं ... बाहेर फेकून दिलं ...'' मम्मी म्हणाली.

"अग मम्मी ... ! तू हे काय केलंस ?" असं म्हणत पप्पू रडायला लागला.

"पण बेटा, चिमणी चोचीतून भलताच कचरा, किडे आणत असे. ते सगळं स्वयंपाकात पडत असे; म्हणून मी घरटं काढून टाकलं."

"पण मम्मी, चिमणी आता अंडी घालणार होती, त्यावेळीच तू घरटं फेकून दिलंस... ? आता ती बिचारी काय करेल...? अंडी कुठे घालणार ती...?"

"बेटा, दुसऱ्या कुठल्याही जागेवर घरटं केलं असतं, तर मी ते राहू दिलं असतं. स्वयंपाकघरात घरटं कसं चालेल?"

पप्पू खूपच हताश, उदास झाला. साखरेसारखी गोड वाटणारी मम्मी आज कडू वाटली.

सबंध संध्याकाळ पप्पू गप्पगप्प बसून राहिला. बसल्या बसल्या सगळीकडे बघत राहिला ... कुठेच नाही दिसली त्याची चिमणी व तिचे घरटे ! पप्पूने काही खाल्ले नाही. उपाशी पोटीच झोपला.

चार-पाच दिवस असेच गेले. एके दिवशी संध्याकाळी पप्पू शाळेतून येऊन आपल्या खोलीत शिरला. तेवढ्यातच त्याची चिमणी फ...र...र... करत उडाली. चिमणी उडत उडत पप्पूच्या खांद्यावर येऊन बसली... ! जसे काय पप्पूजवळ ती आसरा मागत होती ! चिमणीला पाहून पप्पू खूष झाला. त्याला वाटले नक्कीच चिमणीने ह्या खोलीतच कुठेतरी घरटे बांधले असावं. तो सगळीकडे शोधू लागला. इतक्यात चिमणी उडून कपाटावर बसली. पप्पूने टेबलावर चढून पाहिले, तर कपाटावर त्याच्या पुस्तकांच्या बॅगेच्या मागे घरटे होते... ! आणि त्या घरट्यात चार अंडीपण होती... ! पप्पूच्या आनंदाला पारावर नव्हता. त्याचा आवाज ऐकून मम्मी धावतच आली. आनंदित झालेला पप्पू मम्मीला गोलगोल फिरवत बोलू लागला,



"मिळाले, मिळाले ... मम्मी चिमणी आणि तिचे घरटे मिळाले ... आणि तू पाहातरी ... ! तिने घरट्यात किती छान छान, चिमुकली चिमुकली, पांढरी चार अंडीपण घातली आहेत ... !" पप्पूला खूश झालेला पाहून मम्मीपण खूष झाली.

"मम्मी मला फारच भूक लागली आहे. खायला दे." आज पप्पू पोटभर जेवला.

रोज सकाळी उठून, पप्पू एकदा तरी घरट्यात डोकवायचा, अंडी जागेवर आहेत का ते पाहायचा.

अंड्यातून पिल्लू बाहेर पडण्याची तो वाट बघत होता. एके दिवशी पप्पू सकाळी खोलीत गेला, तेवढ्यातच त्याच्या कानावर चीं...चीं...चीं असा आवाज पडला. लगेच टेबलावर चढून त्याने पाहिले, तर घरट्यात लहान लहान चार पिल्ले...! एकदम आनंदात येऊन तो नाचू लागला. धावत जाऊन आपल्या मित्रांना बोलवून आणले. छान छान चिमुकली पिल्ले पाहून त्याचे मित्रदेखील खूष झाले.

आणखी काही दिवस गेले. पप्पू पिल्लांना घेऊन खाली आला. पिल्लांसाठी शिजवलेला भात आणला. चिमणी आपल्या चोचीमध्ये भात घेऊन पिल्लांच्या उघड्या चोचीत ठेवू लागली. पप्पूने खोलीत पाणी भरलेली एक वाटीपण ठेवली. पिल्ले आता धडपड करू लागली. पप्पूला हे सगळे पाहण्यात खूप मजा वाटायची. शाळेतून आल्यावर तो चिमणी व तिची पिल्ले याच्यांतच गुंतून जायचा. काही दिवसांनी पिल्ले फ...र...र फ...र...र करीत थोडे थोडे उडायलापण लागली. चिमणी पिल्लांना उडायला शिकवायची. पप्पू हे सर्व रोज पाहायचा व आनंदी व्हायचा.

एके दिवशी सकाळी उठून पप्पूने पाहिले, तर चिमणीच्या मागे एक पिल्लूपण फ...र...र करत बाहेर उडून गेले. थोड्या वेळाने चिमणी

परत आली. परत बाहेर गेली, तेव्हा दुसरे पिल्लू फ...र...र...र... करीत उडून गेले. असे करत चिमणीबरोबर एका पाठोपाठ एक, अशी चारी पिल्ले उडून गेली ! चिमणी परत येऊन दारावर बसली.

पप्पू म्हणाला, ''तूपण जा चिमणी, आनंदाने जा ... परत जेव्हा अंडी घालायची असतील, तेव्हा मात्र तू इथेच ये. आता ही जागा तुझीच आहे.''

आणि ...

चिमणी उडून गेली .... फ ... र ... र ... र ...

लेखिका : पुष्पा अंताणी

मराठी अनुवाद : उषाबेन शेठ

●●●

गुजराती

बालभारती : इ. ५ वी

तिसरी माला : १९९३



# १७. खरी विद्या

धौम्य नावाचे एक ऋषी होते. एका सुंदर नदीकाठी त्यांचा आश्रम होता. आश्रमात चार - पाचशे शिष्य होते. ते गुरूंजवळ वेदाध्ययन करत असत.

दररोज सकाळी गुरूंच्या पर्णकुटीतून स्वाहा स्वाहाचा घोष ऐकू येत असे आणि त्याचबरोबर आंतरिक पापांना धुणाऱ्या सुवासिक धुरांची वलये आकाशात जाताना दिसत असत. रोज सकाळी आश्रमातल्या वृक्षांवर झोके घेणाऱ्या पक्ष्यांच्या किलबिलाटानी आश्रमाचा आसमंत भरून जात असे. रोज सकाळी काही शिष्य वेदोच्चार करत असत तर काही वृक्षांना पाणी घालत असत, काही शिष्य अर्घ्य देण्यासाठी फुले वेचत असत, तर काही आश्रमातले रस्ते साफ करत असत. कोणी एखादा झाडाच्या फांदीवर कपडे वाळत घालताना दिसे, तर दुसरा एखादा वृक्षांच्या सावलीत ध्यानमग्न झालेला दिसे. रोज सकाळी ऋषीपत्नी पर्णकुटीच्या पडवीत बसून पाडसांना दर्भ व दुर्वांचा चारा भरवत असत. ती पाडसेही तिथे मजेत बागडत असत.

एकदा पर्णकुटीच्या अंगणात नेहमीप्रमाणे सर्व जमले होते. शास्त्र व जीवनाच्याही निरनिराळ्या प्रश्नांवर चर्चा चालू होती. गुरुंनी सर्वांवरून एक नजर फिरवली. पुन्हा पुन्हा बघितले. एखादे मेंढरू कमी दिसले, की त्याला शोधून काढताना धनगराच्या चेहऱ्यावर जशी काळजी दिसते, तशा काळजीच्या सुरात धौम्यऋषींनी विचारले, ''आज आरुणी का दिसत नाही ?''

गुरुंची सेवा करून झाल्यानंतर वेळ असल्यास इतर गुरुबंधूंची कामेही आरुणी हौसेने करायचा. कोणाच्या वाफ्यांना पाणी घाल, तर कोणाची पर्णकुटी स्वच्छ कर. एखादया आजारी आश्रमवासियांसाठी

जागरण करायचे असो, वा एखाद्याचे वल्कल शिवायचे असो आरुणी तयार असायचा. अध्ययन लवकर संपवण्याची घाई असणारे कितीतरी शिष्य अशी अनेक कामे आरुणीकडून शिताफीने करून घेत आणि वर त्याच्या बावळटपणावर हसत.

गुरुंनी पुन्हा विचारले, ''आरुणी का दिसत नाही?''

''झोपला असेल,'' एक म्हणाला.

''वासरांना बांधत असेल,'' दुसऱ्याने सांगितले.

''गेला असेल शेतात पाखरांना हाकलायला. त्याला कुठे अध्ययन करायचे आहे ? अध्ययनासाठी आला असता तर असा वागलाच नसता. वीस वर्षे झाली, अजून एकही ऋचा पाठ झाली नाही त्याची.''

एका वेदपाठीला आली दया. ''कोणास ठाऊक चुकून येथे कसा आला बापडा ! आपण वेदांचे रहस्य सांगत असता, तेव्हा आमची बुद्धी देखील कमी पडते. मग बिचारा आरुणी काय करणार ?''

धौम्य ऋषींनी सर्वांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले. एक क्षण मनाला आवरले. ''असो, येईल यायचे तेव्हा. आपण आपली चर्चा चालू ठेवू या.''

चर्चा सुरू होते न होते तोच अचानक काळ्या ढगांनी आकाश भरून आले. चोहीकडे काळोख दाटला. विजा कडाडू लागल्या आणि कानठळ्या बसवणारा गडगडाटही सुरू झाला.

''गुरुदेव, हा तर आला बरं.''

''आता कोसळलाच समजा.''

''अरे, बघ बघ ते ढग किती खाली आले ते. आता तर शेतंपण दिसत नाहीत.''



''आणि ह्या बाजूचे वृक्षही दिसेनासे झाले आहेत.''

गुरुदेव म्हणाले, ''चला, सगळे माझ्या पर्णकुटीत चला.''

इतक्यात मुसळधार पाऊस सुरू झाला. जणू आकाशच कोसळले. आश्रमभर पाणीच पाणी.

''आपण शेतात नवीन बांध घातला आहे. तो खचला तर शेतात पेरलेले सर्व काही वाहून जाईल. कोणत्याही परिस्थितीत बांध वाचवायलाच पाहिजे,'' गुरुंनी शिष्यांकडे पाहिले.

''गुरुदेव, मी माझे वल्कल वाळत घातले आहे ते बघून येतो. नाहीतर उडून जाईल,'' एक गेला.

''गुरुदेव, माझी पर्णकुटी गळत असणार,'' दुसऱ्यानेही काढता पाय घेतला.

''गुरुदेव, माझी ऋचा अर्धी राहिली आहे ती पाठ करून येतो,'' तिसऱ्याने पोबारा केला.

असे एकापाठोपाठ सर्व शिष्य काहीनाकाही निमित्त सांगून निघून गेले.

एवढ्यात धापा टाकीत आरुणी आला. ''गुरुदेव, शेतातला बांध वाहून जाण्याच्या बेतात आहे. आपली आज्ञा असेल, तर जाऊन मातीची भर घालतो. खरं तर होमाच्या तयारीसाठी आलो होतो. ती झाल्यावर जाऊ ?''

''तू आपला जा. आरुणी. पाणी थोपवून धर. होमाची तयारी तर कोणीही करेल; पण शेत सुरक्षित राहिले पाहिजे.''

आरुणी सुसाट निघाला. रानात अनेक ठिकाणी कमरेपर्यंत पाणी साचले होते. पाय गाळात रुतत होते. पायात घुसलेले काटे

काढण्यासाठी सारखे थांबावे लागत होते.

वारा आणि पाऊस यांचे थैमान तर चालूच होते. कशाचीही पर्वा न करता सपासप पाणी कापीत आरुणी बांधाजवळ जाऊन पोचला.

पाऊस धो धो पडतच होता. अशा पाण्याखाली बंधारा जास्त वेळ टिकणे अशक्य होते. तो कोणत्याही क्षणी फुटला असता. आरुणीने भराभरा त्याच्यावर माती टाकायला सुरुवात केली, पण सगळी माती वाहून जाऊ लागली.

आरुणी हतबल होऊन बघत राहिला. आश्रमातली गेली वीस वर्षे त्याच्या नजरेसमोर उभी राहिली. 'वीस वर्षांत माझ्या हातून एकाही आज्ञेचा भंग झाला नाही. वीस वर्षांच्या तपश्चर्येवर पाणी फिरू द्यायचे?'

अचानक त्याच्या मनात वीज चमकली. त्याच्या संपूर्ण शरीरात नवा जोम संचारला आणि खचत असलेल्या बंधाऱ्याच्या जागी आरुणीचे शरीर आडवे झाले. हाडामासांच्या त्या जिवंत बांधाने पाणी थोपवले. वाहून येणाऱ्या मातीचे थरच्या थर आरुणीच्या शरीरावर चढत गेले.

दुसरा दिवस उगवला. होमहवन संपवून गुरु बाहेर आले व विचारू लागले, "आरुणी कुठे आहे ?"

"भटकत असेल रानात," एक म्हणाला.

"आताच इकडून जाताना पाहिला," दुसरा म्हणाला.

"त्याला काल बांधावर पाठवले होते. बहुतेक तो तिथेच थांबला असेल. त्याला नाहीतरी तेच हवे असते," तिसरा बोलला.

"अरे हो, आरुणी परत आलेला दिसत नाही. चला आपण सर्वजण शेतावर जाऊ," गुरु म्हणाले.



संपूर्ण गुरुकुल शेताकडे निघाले.

"आज तर आरुणीला चांगले खडसावायचे."

"बरे झाले. आज चोर आयता सापडेल."

"रोज रात्री पळून जातो आणि वर सांगतो, की मी गुरुंजवळ झोपतो. आज खरे काय ते सर्वांना कळेल."

थोड्याच वेळात शेत आले. पावसाने माती चिंब झालेली. आरुणी कुठे दिसेना.

"आरुणी ...... आरुणी !" गुरुंनी हाका मारल्या.

"आरुणी कुठला आलाय इथे ! तो गेला असेल कुठेतरी पळून."

गुरुंनी पुन्हा हाक मारली. "आरुणी !"

हाडामांसाच्या बंधाऱ्याला कान फुटले. गुरुंचा आवाज कानावर पडताच मातीचे थर झटकून आरुणी उभा राहिला; आणि गुरुंकडे धाव घेतली.

"आलास, बाळ !" मातीने माखलेल्या त्याच्या शरीराला गुरुंनी कडकडून मिठी मारली.

गुरुंचे हात सोडवून आरुणीने गुरुचरणी माथा टेकवला.

"काय रे, कुठे होतास इतका वेळ ?" एकाने विचारले.

आरुणीऐवजी गुरुंनीच उत्तर दिले. नंतर त्यांनी शिष्यांकडे मोर्चा वळवला.

"दुष्टांनो, तुम्हांला माहीत नाही; पण आरुणीला स्पर्श करायचा देखील अधिकार नाही तुम्हांला तुमच्या बुद्धीची घमेंड आहे तुम्हांला ज्ञानाच्या अहंकाराने तुम्ही अंधळे झाला आहात. तुमचे मंत्रोच्चार आणि

तुमच्या ऋचा यांची तुम्हाला नशा चढली आहे. तुमची विद्या म्हणजे अवडंबर आहे. नुसता अवडंबर! खरी विद्या आत्मसात केली आहे आरुणीनेच फक्त.

"बाळा, आरुणी, तुझ्या चेहऱ्यावर मला वेदांचा आणि शास्त्रांचा प्रकाश दिसतो आहे. जा, तुझे कल्याण असो! तुला वेगळ्या आत्मज्ञानाची गरज नाही."

आरुणी मुकाच राहिला. पुन्हा एकदा त्याने गुरुंना वंदन केले.

सर्व शिष्य आणि गुरू आश्रमाकडे परत यायला निघाले.

लेखक : नानाभाई भट्ट

मराठी अनुवाद : पद्माबेन मेहता

●●●

गुजराती
बालभारती : इ. ६ वी
तिसरी माला : १९९४



# १८. मोठा कोण?

एकदा इंद्र, वायु आणि अग्नी यांचा दुसऱ्या देवतांशी फार मोठा वाद झाला. प्रत्येकजण सांगू लागला, की मी सर्वात मोठा आहे.

इंद्र म्हणाला, "मी पाऊस पाडतो. जर पाऊस पडला नाही, तर जमीन वाळून जाईल आणि संकट कोसळेल."

वायू म्हणाला, "जर पाऊस पडला नाही तर एकवेळ जीवन चालू शकेल, पण माझ्याशिवाय जगणे कठीण होईल; म्हणून मी सर्वात मोठा आहे."

अग्नी म्हणाला, "सर्वात प्रथम उष्णतेची आवश्यकता असते. मानवी शरीरात उष्णता असणे आवश्यक आहे, नाहीतर माणूस जगूच शकणार नाही. माझ्याविना सर्व निरर्थक आहे."

हा वादविवादाचा मुद्दा चालला होता, तेवढ्यात एक तेजस्वी देवी तेथे येऊन दाखल झाली. देवता विचारचक्रात पडले, की ही कोण आली?

अग्नी म्हणाला, "मी देवीजवळ जाऊन सर्व गोष्टींचा खुलासा करून येतो. अग्नी त्या देवीजवळ जाऊन म्हणाला, "तुम्ही कोण आहात?"

त्या देवीने उलट अग्नीला विचारले, "तुम्ही कोण आहात?"

अग्नीने रागाने उत्तरले, "मी अग्नी आहे"

देवीने विचारले, "तुम्ही काय करीत आहात?"

अग्नीने चिडून म्हटले, तुम्हांला माझी शक्ती माहीत नाही. मी एका क्षणात साऱ्या जगाला भस्म करू शकतो."

देवी म्हणाली, ''बरोबर ! मला तुझी शक्ती माहीत नाही; पण हे एक तृण आहे. त्याला जाळून दाखव.''

अग्नीने फार प्रयत्न केला; पण व्यर्थ. त्या तृणावर काही परिणाम झाला नाही. अग्नीने लाजेने माघार घेतली, तेव्हा वायू पुढे होऊन म्हणाला, ''तुम्ही कोण आहात?''

देवीने त्याला विचारले, ''तुम्ही कोण आहात?''

वायू गर्वाने म्हणाला, ''मी वायू आहे.''

देवीने विचारले, ''तुम्ही काय करता?''

वायूने उत्तरले, ''मी पर्वतांनाही मातीच्या ढिगाप्रमाणे उडवून टाकत असतो. वादळी वाऱ्याच्या झटक्याने मोठमोठ्या जहाजांना बुडवून टाकतो. माझे काय महत्त्व आहे, ते तुला माहीत नाही का?''

देवी म्हणाली, ''नाही ! ही एक काडी आहे. त्या काडीला हालवून तर दाखव.''

वायूने आपल्या संपूर्ण सामर्थ्यानिशी तिला हलविण्याचा प्रयत्न केला; पण ती काडी यत्किंचितही हलली नाही. तोही लज्जित होऊन माघारी गेला. त्यानंतर देवराज इंद्राने देवीला विचारले, ''तुम्ही कोण आहात?''

देवी उत्तरली, ''प्रथम तू सांग, की तू कोण आहेस?''

इंद्र मोठ्या अभिमानाने म्हणाला, ''तुला माहीत नाही का, की मी देवतांचा राजा इंद्र आहे. मी मनात आणले, तर सर्व जगात प्रलय घडवून आणू शकतो. साऱ्या जगाला पाण्यात बुडवून टाकू शकतो.''

देवी स्मित करीत म्हणाली, ''ठीक आहे. तूर्त ही एक काडी पाण्यात बुडवून दाखव.''



इंद्राने पुष्कळ प्रयत्न केला; पण तो एका काडीलाही बुडवू शकला नाही. शेवटी शरमेने मान खाली टाकून उभा राहिला. सर्वांचा गर्व कापराप्रमाणे नाहीसा झाला.

त्यानंतर देवी म्हणाली, ''गर्विष्ठपणा करता ! मी मोठा, मी मोठा करून स्वतःला श्रेष्ठ समजता? कोणी मोठे नाही, कोणी लहान नाही. परमेश्वराने इंद्राला पाणी बरसवण्याची शक्ती दिली आहे, त्यामुळेच इंद्र पाऊस पाडू शकतो. अग्नीला आग लावण्याची शक्ती दिली असल्याने ती जाळू शकते. वायूला वाहण्याची शक्ती दिली आहे, त्यामुळे त्यासाठी तो वाहू शकतो. परमेश्वराने जर आपली शक्ती तुमच्याकडून परत घेतली, तर तुम्ही काहीही करू शकत नाही. आपल्या शक्तीवर गर्व करू नका आणि दुसऱ्यांना दुर्बळ समजू नका.''

शेवटी देवी म्हणाली, ''जी शक्ती देवतांमध्ये असते, ती माणसांमध्येही आपापले कार्य करीत असते. कोणत्याही माणसाने त्या शक्तीच्या कारणामुळे स्वतःला मोठे समजू नये. रणांगणावर लढणाऱ्या शिपायाला श्रेष्ठ पंडिताने कमी समजू नये. प्रत्येकाचे कार्य एकदुसऱ्या इतकेच महत्त्वाचे असते.''

मराठी अनुवाद : श्री. तोलाराम रहेजा

•••

सिंधी
बालभारती : इ. ५ वी
चौथी माला : १९९९

# १९. आर्यभट

सर्वसामान्य लोकांत असा समज आहे, की जगातील विज्ञानाचे शोध युरोपच्या लोकांनी लावले; पण प्राचीनकाळी जेव्हा युरोपमध्ये अजून फारशी प्रगती झालेली नव्हती, तेव्हा भारतातील अनेक संशोधकांनी नवे नवे शोध लावून सर्वांना आश्चर्यचकित केले होते.

भारताचा पूर्वेतिहास पाहिला असता, सर्वात आधी प्रसिद्ध संशोधक आणि गणित तज्ञ आर्यभटाचे नाव अग्रभागी दिसते.

आर्यभट यांचा जन्म कसमपूर (पाटणा)मध्ये इ. स. ४७६ मध्ये झाला. इ. स. ४९९ मध्ये जेव्हा ते केवळ २३ वर्षांचे होते, तेव्हा त्यानी 'आर्यभट' या नावाच्या ग्रंथाची रचना केली. त्या पुस्तकात गणित आणि ज्योतिषाचे कित्येक सिद्धांत दिले आहेत. सुरुवातीस या पुस्तकाबद्दल कोणालाही माहिती नव्हती; पण जेव्हा भारत व आशियाच्या अनेक विद्वानांनी आपल्या ग्रंथात आर्यभटाच्या सिद्धांताचा उल्लेख केला, तेव्हा त्यांना माहीत झाले की, आर्यभट हा त्यावेळचा गणित विद्येतील महान पंडित, ज्योतिष शास्त्राचा संशोधक होता. त्याने एका ग्रंथाची रचनाही केली आहे. विद्वानांच्या उल्लेखाच्या आधारावर त्या ग्रंथाचा शोध सुरू झाला आणि अखेर इ. स. १८६४ मध्ये त्याचा शोध लागला.

आर्यभटाची व्यक्तिगत माहिती आजही पुरेशा प्रमाणात उपलब्ध नाही. किती वर्षे तो जिवंत राहिला, त्याने आणखी किती ग्रंथ लिहिले ? याबाबत पुरेशी माहिती मिळत नाही.

आजकाल आपण शून्याच्या साह्याने शेकडो, हजारो, लाखो आणि कित्येक कोटीपर्यंत आकडे लिहू शकतो; पण अशीही एक वेळ होती, की विद्वानांना फक्त एक ते नऊ आकड्यांचे ज्ञान होते. आर्यभटाने शून्याचा शोध लावून गणित विद्येला एक नवे वळण दिले. शून्याचा शोध लागला नसता, तर हिशोबाच्या कामाचा विकास झाला नसता. आर्यभटाने गणित



आणि भूमितीशी संबंधित अनेक प्रमेय व सिद्धांत मांडले. त्यांनी काही विशिष्ट हिशोब करण्याची सोपी पद्धती समजावली आहे. आर्यभटाचा हा ग्रंथ म्हणजे जगातील प्रमुख ग्रंथ म्हणून मानला जातो.

आर्यभटाने विज्ञानाच्या क्षेत्रांतही अनेक नवीन संशोधन करून जगाला चकित करून टाकले. ज्या काळी ज्ञानाची साधने व सोयी उपलब्ध नव्हत्या, त्या काळात पृथ्वीसंबंधी व आकाशासंबंधी त्यांनी संशोधन केले. त्यांनी सिद्धांत मांडले, की पृथ्वी गोल आहे आणि ती आपल्या अक्षाभोवती फिरते.

त्या काळच्या पंडितांच्या म्हणण्याप्रमाणे राहू नावाच्या राक्षसाच्या कारणामुळे सूर्य-चंद्राचे ग्रहण होत असते. लोकांमध्येही याबाबत अंधश्रद्धा पसरलेली होती; म्हणून चंद्र किंवा सूर्याच्या ग्रहणाच्या वेळी लोक अंघोळ करून पाठपूजा आणि दान वगैरे करीत. ते म्हणायचे, की असे केले म्हणजे सूर्य व चंद्राची राहूपासून सुटका होईल; पण आर्यभटाने सांगितले, की पृथ्वी फिरता फिरता सूर्य व चंद्र यांच्यामध्ये येते, तेव्हा चंद्रग्रहण होते. अशाप्रकारे जेव्हा सूर्य आणि पृथ्वी यांच्यामध्ये चंद्र येतो, तेव्हा सूर्यग्रहण होते. आर्यभटाचे हे मत त्या काळात कोणीही मान्य केले नाही. उलट विद्वान लोक त्यांच्यावर टीका करीत राहिले. अखेर काही काळ लोटल्यानंतर त्याचे मत प्रत्येकाला मान्य करावे लागले.

अशा शास्त्रज्ञाचे नाव कायम स्मरणात राहण्यासाठी १९ एप्रिल सन १९७५ साली भारतातर्फे अवकाशात पहिला उपग्रह सोडण्यात आला, त्याचे नाव आर्यभट असे ठेवण्यात आले.

लेखक : हुंडराज बलवानी

मराठी अनुवाद : तोलाराम रहेजा

•••

सिंधी

बालभारती : इ. ६ वी

तिसरी माला : १९९४

# २०. 'कथा-बिंदू'

## १. तिमप्पय्याची तपश्चर्या

तपश्चर्या करण्याचं वेड तिमप्पय्याच्या डोक्यात शिरलं होतं. पासष्ट वर्षांचा म्हातारा तो. शिवाय त्याच्या घराण्यात सगळ्यांची डोकी थोडी रिकामीच असायची ! 'पूर्वीच्या काळी देवाची तपश्चर्या करून विपुल धनसंपत्ती मिळवली पाहिजे' असा विचार करून तो आपल्या जुन्या घराच्या तळघरात गेला आणि अन्न-पाणी सोडून, डोळे मिटून एका जागी बसला. तोंडाने 'नारायण-गोविंदा, गोविंदा-नारायणा' असं देवाचं नामस्मरण सुरू केलं.

असा आठवडा गेला. त्याचं शरीर अशक्त झालं. अगदी मरायला टेकला म्हणा ना ! घरच्या माणसांनी खूप विनवलं, 'वर या बघू ! पुरे झाली तुमची तपश्चर्या !' पण त्याही परिस्थितीत म्हातारा त्यांच्यावरच ओरडायचा.

ही बातमी मला समजली. मी त्यांच्या घरच्या माणसांना सांगितलं, 'मी आजोबांना या वेडातून बाहेर काढतो ; पण तुम्ही मला त्यासाठी काही गोष्टींची परवानगी दिली पाहिजे, त्यांनी परवानगी दिली. सगळे कबूल झाल्यावर मी नाटक कंपनीतून विष्णूचा वेष मिळवून आणला. मरणाला वाचवण्यासाठी थोडी-फार फसवणूकही क्षम्य ठरेल असं सगळ्यांचं मत पडलं.

रात्रीची वेळ. नऊ वाजले असतील. तळघराच्या कोपऱ्यात एक लहानशी जळती मेणबत्ती .... भोवताली शांतता .... म्हातारा भिंतीकडे तोंड करून 'नारायणा-गोविंदा, गोविंदा-नारायणा' अशा हाका मारतोय...

मी विष्णूचा वेष चढवून अजिबात चाहूल लागू न देता त्याच्या



मागे जाऊन उभा राहिलो आणि गंभीर स्वरात म्हणालो, 'भक्ता, तिमप्पय्या - का हाक मारलीस ?'

तिमप्पय्या दचकला. त्यानं वळून पाहिलं. मला डोळे भरून पाहात तो उद्गारला, 'परमेश्वरा, नारायणा ! अखेर भक्ताची दया आली म्हणायची !'

आपण उगाच याची फसवणूक केली या विचारानं मी मनोमन खजील झालो ; पण आता काही करणंही शक्य नव्हतं. मी पुन्हा गंभीरपणे म्हटलं, 'भक्ता, तुझ्या इच्छेप्रमाणे मी आलो आहे ! तुला काय हवं ते माग !'

तिमप्पय्यानं डोळे मिटले. जीभ ओठांवरून फिरवत कसा-बसा श्वास घेत तो उद्गारला,

'काही नको परमेश्वरा ! एक .... अर्धा पेला ... लिंबाचं .... सरबत !'

## २. 'अगदी खरंय !'

दादा पापर आणि श्रीनाथ कॉलेजमध्ये एकत्र शिकत होते, तेव्हा त्या दोघांमध्ये दाट मैत्री जुळली. दोघांची हृदये परस्परांच्या स्नेहभावानं विणली गेली. कॉलेजचं शिक्षण संपल्यावर पापरने मलय - द्विपावर इस्टेट-एजंट म्हणून दरमहा शेकडो रुपयांच्या पगाराची नोकरी स्वीकारली. तो निघून गेला. श्रीनाथ मात्र म्हैसूरमध्येच चाळीस रुपये पगाराची कारकुनाची नोकरी करू लागला.

दोन्ही मित्रांची प्रत्यक्ष भेट नसली तरी पत्रव्यवहाराच्या रूपानं परस्परांशी संपर्क होता. आठ वर्षांनंतर पापर काही कामानिमित्त म्हैसूरला आला. रविवारी सकाळी साडेआठ वाजता दोघांनीही परस्परांना भेटायचं असं ठरवलं. किती केलं तरी स्नेहभावानं विणलेली हृदये त्यांची !

या भेटीच्या विचारानं दोघंही पुलकीत होऊन गेले होते.

श्रीनाथ विचार करत होता — मित्र झाला म्हणून काय झालं ? पापरसारख्या मोठ्या माणसाला भेटायला विरलेलं धोतर आणि फाटलेला शर्ट घालून जाणं बरं दिसणार नाही ! त्यानं आठ-दहा जणांकडे तोंड वेंगाडलं आणि भेटीसाठी योग्य अशा वस्तू जमवल्या.

पापरही विचार करत होता — बिचारा श्रीनाथ ! गरीब माणूस ! त्याच्या भेटीला जाताना हे भारी कपडे घातले, तर त्याला हिणवल्यासारखं होईल ! त्यानं अगदी साधे मळकट आणि हलके कपडे शिवले.

रविवारची सकाळ उजाडली.

श्रीनाथचा थाट-माट काय विचारता ! चापून-चोपून नेसलेलं रेशमी काठाचं धोतर, सिल्कचा शर्ट, ब्लेझर कोट, करकरीत नवा फेटा, पायात बूट, छातीवर सोन्याच्या घड्याळाची साखळी, शिवाय जाण्यासाठी टांगा !

उलट पापर मात्र नव्यानं शिवलेले मळकट कपडे घालून पायीच मित्राला भेटायला निघाला.

दोघंही मित्र चौकात समोरा-समोर आले. श्रीनाथनंच पापरला ओळखलं. दोघांनीही एकमेकांचा हात हातात घेऊन परस्परांना नखशिखांत पाहिलं.

'अरेच्चा ! चाळीस रुपये पगारात हा जर एवढ्या थाटात राहात असेल, तर गरिबी याची पाठ कशी सोडेल ? अगदी खरंय !' पापर स्वत:शी म्हणाला.

दोघांनीही परस्परांना नीट ओळखलं !



## ३. परीक्षा

छे: ! तिनं पुन्हा सारेगम घोकायला सुरुवात केली !

'असं रात्रं-दिवस हार्मोनियम वाजवत ही ओरडत राहिली, तर माझ्या डोक्यात वाचलेलं कसं काय शिरणार ? मी परीक्षेत पास होणार, की सगळी मेहनत मातीमोल होणार ? नको म्हटलं तरी ऐकत नाही बिचारी ! घरच्या माणसांनाही समजत कसे नाही ? त्यांनी तरी तिला गाऊ नको म्हणून नको का सांगायला ? समोर परीक्षा उभी ठाकली आहे. अम्मा ! काय हे ?' माझी तक्रार सुरू झाली.

बाहेर माझी छोटी बहीण हार्मोनियम शिकत होती. त्या गोंधळात केलेला अभ्यास माझ्या डोक्यात शिरत नव्हता. आईपुढे ओरडून-ओरडून माझा घसा सुकून गेला. अखेर वैतागून पुस्तकं उचलली आणि बागेत निघून गेलो.

बागेत गेल्यावरही विचार सुरुच होते. वाटलं, मालती गाणं शिकते त्यात काही चूक नाही. प्रत्येकाची परीक्षा प्रत्येकाला महत्त्वाचीच असते. मी आता नीट अभ्यास केला नाही तर ?

उद्या मालती मोठी होईल. तिला बघायला येणारे विचारतील, 'मुलीला हार्मोनियम वाजवता येतो का ? गाणं म्हणता येतं का ?' त्यावेळी तर पुन्हा-पुन्हा परीक्षेला बसण्याचीही सोय नसेल. मग ?

खरंय ! प्रत्येकाला आपापल्या परीक्षेची काळजी असते हेच खरं.

लेखक : जी. पी. राजरत्नं
अनुवाद : सौ. उमा वि. कुलकर्णी

कन्नड
बालभारती : इ. ६ वी
पहिली माला :

# २१. बालपणीच्या आठवणी

सुमारे शंभर वर्षांपूर्वी 'पगटिचुक्का' नावाचा एक दरोडेखोरांचा नायक राहात होता. त्याच्या तैनातीत पाचशे सशस्त्र दरोडेखोर होते. या पगटिचुक्काच्या भयंकर टोळीनं त्या पंचक्रोशीतलं प्रत्येक गाव, प्रत्येक खेडं लुटलं होतं.

काही सावकार मंडळींनी 'पगटिचुक्काला' पकडून देणाऱ्यास रुपये दहा हजाराचं बक्षीस ठेवलं, ही दहा हजाराची रक्कम हळूहळू पंचवीस हजारपर्यंत वाढत गेली; पण 'पगटिचुक्का' काही हाती लागला नाही. ज्या ज्या लोकांनी पगटिचुक्काला पकडण्याचा प्रयत्न केला त्या त्या लोकांना दरोडेखोरांनी यमसदनाला पाठवले. शेवटी एका स्त्रीनं मोठ्या हिकमतीनं, गोडीगुलाबीनं पगटिचुक्काला भुरळ पाडून पोलिसांच्या हवाली केलं. पगटिचुक्कावरील आरोपांची चौकशी सुरू झाली. न्यायमूर्ती त्याला जबर शिक्षा सुनावणार याची सर्वत्र चर्चा होऊ लागली.

या दरम्यान पगटिचुक्काच्या साथीदारांनी आपल्या सरदाराला सोडवण्याचे अनेकविध प्रयत्न केले; परंतु पोलिसांच्या अतिदक्षतेमुळे त्यांचे सारे प्रयत्न निष्फळ ठरले. चोरांनी एक युक्ती योजली. न्यायमूर्तींचा एकुलता एक मुलगा फिरायला जाऊन परतताना त्या दरोडेखोरांनी त्याचे अपहरण केले आणि न्यायमूर्तीला असे पत्र लिहिले– 'आमच्या सरदाराला मुक्त केल्यासच, तुमचा मुलगा वाचू शकेल. पगटिचुक्काच्या केसाला जरी धक्का लागला, तर तुमच्या मुलाचा शिरच्छेद केला जाईल.'

दरोडेखोरांचे हे पत्र वाचून न्यायमूर्तींच्या सुनेनं आकांत केला. सासऱ्याच्या पायावर लोळण घेत ती म्हणाली, "माझ्या पतीचे प्राण तुमच्या हातात आहेत. तुमच्या मुलाला वाचवून मला पतीभिक्षा वाढा." न्यायमूर्ती म्हणाला, "मुली ! या संकटातून आता आपल्याला परमेश्वरच वाचवू शकेल. धीर सोडू नकोस. अनेक निरपराधांची अमानुष हत्या



केलेल्या दरोडेखोराला शिक्षा न करता मुक्त करणे कसे शक्य आहे ? मी माझा धर्म पाळला नाही, तर माझी बदनामी होईल, मी पापाचा धनी होईल."

"काहीही करा, माझ्या पतीचे प्राण वाचवा."

"मुली, माझी नियुक्ती न्याय देण्यासाठी झाली आहे, न्याय-व्यवस्थेवरचा लोकांचा विश्वास उडेल असे कृत्य मी करणार नाही."

दुसऱ्या दिवशी न्यायमूर्तींनी न्याय दिला. आपल्या मुलाच्या जीवाचा विचार न करता, न्यायधर्माचा विचार करून त्यांनी पगटिचुक्काला फाशीची शिक्षा ठोठावली.

लोकांच्या समाधानासाठी न्यायमूर्तीनं मला अशी शिक्षा ठोठावली. आपल्या मुलाला वाचवण्यासाठी तुरुंगाधिकाऱ्यावर दबाव टाकून ते माझी बिनबोभाट मुक्तता करतील असं पगटिचुक्काला वाटलं; परंतु असं काही घडलं नाही. पगटिचुक्का क्रोधानं लालेलाल होऊन गरजला, "माझ्याबरोबर तुमच्याही मुलाचं मरण निश्चित आहे तर ! आता बसा पुत्रशोक करीत जन्मभर." मग त्यानं आपल्या साथीदारांना तातडीनं संदेश धाडला, 'मी फासावर लटकण्याआधी न्यायमूर्तींच्या मुलाचं मुंडकं छाटून, त्यांच्या दारासमोर टाका."

पगटिचुक्काला फाशी देण्याचा दिवस उगवला. त्या दिवशी सकाळीच तुरुंगाधिकारी पगटिचुक्काच्या कोठडीत जाऊन म्हणाला,

"तुझी एखादी शेवटची इच्छा असेल, तर सांग. ती पूर्ण करण्यात येईल." त्यावर पगटिचुक्कानं कोणतीच इच्छा नसल्याचं सांगितलं. "ठीक ! आता परमेश्वराचं स्मरण कर आणि मरायला तयार हो" अधिकारी. "आतापर्यंत मी कधीही परमेश्वराचा विचारच केला नाही. आता त्याचं स्मरण तरी कसं करू ?" निर्विकारपणे पगटिचुक्का बोलला. "परमेश्वर अत्यंत दयाळू आहे. त्याचं निदान एकदा तरी स्मरण कर, म्हणजे तुझ्या या जन्मातल्या सर्व पापाचं क्षालन होऊन जाईल, नाही तर

तू नरकात जाऊन पडशील'' अधिकारी म्हणाला.

''माझ्या नशिबात जर नरकच लिहिला, असेल तर तो कदापी चुकणार नाही. जन्मात न केलेली प्रार्थना मी आता केली, की एका क्षणात माझी नरकातून सुटका होईल तरी कशी ?'' पगटिचुक्कानं विचारलं.

''का होणार नाही ? सारं आयुष्य दुष्ट मार्गानं घालवून शेवटच्या क्षणी एखादं पुण्यकार्य करू नये, असं कुणी सांगितलं ?'' अधिकारी म्हणाला.

''देव कसा असतो ? याबद्दल मी कधीच विचार केला नाही, तेव्हा त्याचं स्मरण मी कसं करू ?'' पगटिचुक्का म्हणाला.

''परमेश्वर अत्यंत दयाळू आहे, हे तुला मी आधीच सांगितलंय. ठीक, तुला देवाच्या स्वरूपाची कल्पना करता येत नसेल, तर तुझ्या आयुष्यात तुझ्याशी अत्यंत दयेनं वागलेल्या व्यक्तीला आठव. तीच व्यक्ती देव समजून तू प्रार्थना कर.'' असं सांगून तो अधिकारी निघून गेला. पगटिचुक्का विचार करू लागला, ''कोणीबरं मला अत्यंत दयेनं वागवलं ? आईवडील तर आपल्या मुलांशी दयेनं वागतात. माझे वडील तर मला कळण्याआधीच मरण पावले आणि आई मात्र मी दहा वर्षांचा असताना मृत्यु पावली; परंतु आईची एक आठवण मात्र माझ्या मनात अजूनही ठसठशीत आहे. माझी आई माझ्यावर खूप खूप प्रेम करायची, वात्सल्यानं वागायची. ती जर आज असती, तर मी असा दरोडेखोर झालो नसतो, माझ्या आयुष्याचा मार्गच बदलला असता.

आपल्या आईविषयी तो विचार करू लागला. तेव्हा त्याला लहानपणची एक घटना आठवली. 'एके दिवशी तो आपल्या मित्रांबरोबर मातीचे हत्ती तयार करून खेळत होता. एवढ्यात एका मित्राचा तोल जाऊन तो खाली पडला. त्याच्या हत्तीची सोंड तुटली. तो रागानं



त्याच्या हत्तीची सोंड तोडायला निघाला. एवढ्यात त्याची आई धावतच तिथं आली आणि म्हणाली.''बाळ ! त्याचं बाहुलं तोडलं, तर तुझं बाहुलं ठीक होईल काय ? त्याचं बाहुलं त्याला देऊन टाक.'' लहानपणची ही आठवण त्याच्या डोळ्यांसमोर तरळतानाच 'भाऊ' अशी मृदू हाक त्याला ऐकू आली. 'कोण ?' पगटिचुक्कानं विचारलं. त्याच्यासमोर एक स्त्री उभी होती. ''भाऊराया ! पतीभिक्षा मागण्यासाठी ही बहीण तुमच्यासमोर पदर पसरते आहे. माझ्या पतीचे प्राण आता तुमच्याच हातात आहेत.'' ती स्त्री दुःखानं गदगदत म्हणाली. ''म्हणजे तू त्या न्यायमूर्तींची सून आहेस तर ?'' पगटिचुक्का म्हणाला ''होय माझ्या सासऱ्यांनी त्यांचा धर्म पाळला. तुम्हांला मुक्त करणं, त्यांना जमणार नाही. तेव्हा माझ्या पतीला मारून तुम्ही काय फायदा मिळवणार?'' ती.

तिचे उद्‌गार ऐकताच त्याला लहानपणी आईने बोललेले शब्द आठवले, ''त्याचं बाहुलं तोडलं तर तुझी बाहुली ठीक होईल काय ? त्याचं बाहुलं त्याला देऊन टाक.''

खरंच न्यायमूर्तींच्या मुलाला मी ठार मारलं, तर माझा जीव थोडाच वाचेल ? त्या निरपराध माणसाला ठार मारण्यात काय अर्थ आहे ? सारं आयुष्य पापानं बरबटलं आहे, निदान शेवटच्या क्षणी एखादं पुण्यकर्म करूया.'' अशा निर्णयाला येत तो पगटिचुक्का त्या स्त्रीला म्हणाला, ''ताई ! निश्चिंत हो. तुझा नवरा सुरक्षित घरी पोहोचेल,'' असं बोलून त्यानं तिला निरोप दिला. त्यानंतर पगटिचुक्कानं लागलीच आपल्या साथीदारांना तातडीचा शेवटचा संदेश धाडला,

''न्यायमूर्तींच्या मुलाला ताबडतोब मुक्त करा. यापुढे तुम्हीही या दुष्ट मार्गातून मुक्त होऊन आपल्या बळाचा देशाच्या सेवेसाठी उपयोग करा.''

याप्रमाणे पगटिचुक्कानं आपल्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणी एका निरपराध माणसाचा जीव वाचवला, एवढंच नव्हे तर आपल्या साथीदारांनाही त्याने चांगला मार्ग दाखवला.

लेखक : पालंकी वेंकट रामचंद्रमूर्ती
अनुवाद : लक्ष्मीनारायण बोल्ली

तेलुगु
बालभारती : इ. ५ वी
पहिली माला : १९९९

| | | |
|---|---|---|
| प्रथमावृत्ती : २००२<br>विशेष आवृत्ती : २०१० | | © महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक संशोधन मंडळ पुणे - ४११००४. |
| कथानिवड व संपादन सहाय | : | **कन्नड - के. एस. हेगडे**, विद्यासचिव - भाषा<br>**हिंदी - अलका पोतदार**, विशेषाधिकारी - हिंदी<br>**उर्दू - मोमीन जी. एन.**, विशेषाधिकारी - उर्दू<br>**सिंधी - नागराणी विजय**, विशेषाधिकारी - सिंधी<br>**तेलुगु - तुलसी भारत**, विशेषाधिकारी - तेलुगु<br>**गुजराती - केतकी जानी**, विशेषाधिकारी - गुजराती<br>**मराठी - उषादेवी देशमुख**, विशेष सहायक - मराठी |
| मुखपृष्ठ | : | **चंद्रकांत तजबिजे** |
| निर्मिती | : | **श्री. सच्चिदानंद आफळे**, मुख्य निर्मिती अधिकारी<br>**श्री. सुनिल कसबेकर**, निर्मिती अधिकारी |
| अक्षरजुळणी | : | **मुद्रा विभाग**, पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४. |
| कागद | : | ७० जीएस्‌एम्, क्रीमव्होव |
| मुद्रणादेश | : | N/PB/2010-11 |
| मुद्रक | : | मे. कमर्शिअल बुक बाईंडिंग वर्क्स, मुंबई. |
| प्रकाशक | : | **श्री. विवेक उत्तम गोसावी**<br>नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ<br>प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५. |